


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका








मराठी
अभ्यास
परिषद
पत्रिका

# भाषा आणि जीवन

वर्ष ११ : अंक ४ : दिवाळी १९९३

दिवाळी









अनुक्रम



---

**प्रकाशन :** त्रैमासिक (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)

**संपादन समिती :** कल्याण काळे (प्रमुख), अशोक रा. केळकर, अंजली सोमण, द. दि. पुंडे, प्र. ना. परांजपे, मॅक्सीन बर्न्सन, विजया देव, आशा मुंडले, मृणालिनी शहा.

**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** कल्याण काळे, मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे ४११ ००७ (दूरध्वनी ३३६०६१/२४)

**व्यवस्थापकीय संपर्क व पैशाचा भरणा :** मृणालिनी शहा, १ शीतल अपार्टमेंट्स, ४६/४ एरंडवणे, पुणे ४११ ००४ (दूरध्वनी ३३३८६९)

**पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर :** आवरणपृष्ठ तीन पाहा

**सूचना :** पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद किंवा साहित्य संस्कृति मंडळ सहमत असतीलच असे नाही.
या अंकाच्या मुद्रणासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे.

---

**संपादक :** कल्याण काळे प्रकाशक व मुद्रक : मराठी अभ्यास परिषदेसाठी मृणालिनी शहा
**मुद्रणस्थळ :** सिद्धार्थ एंटरप्रायजेस, श्रीकृष्णनगर, पुणे ४११ ००४.

संपादकीय

# एक आगळावेगळा निर्णय

कॅनडात स्थायिक झालेल्या एक भारतीय बाई काही दिवसांपूर्वी माझ्याकडे आल्या. बरोबर त्यांचा दहा वर्षांचा मुलगा होता. आपल्या मुलाला मी मराठी शिकवावं अशी त्यांची इच्छा होती. त्यांचे सासूसासरे आफ्रिकेत स्थायिक झालेले होते, तर आईवडील इंग्लंडमध्ये स्थायिक झालेले होते. नवऱ्याचा कॅनडा ते आफ्रिका असा फिरतीचा व्यवसाय होता. स्वतः बाई कॅनडात कॉन्टॅक्ट लेन्सच्या तज्ज्ञ म्हणून काम करत होत्या. मुलगा कॅनडातल्या शाळेतच शिकत होता. त्याला मराठी अजिबात येत नव्हतं.

मुलाला मराठी शिकवण्यासाठी बाईंनी स्वतःचा व्यवसाय एक वर्षाकरता खंडित केला होता; मुलाचं शिक्षण असंच एक वर्षासाठी खंडित केलं होतं. वर्ष 'वाया' गेल्याची चिंता त्यांना नव्हती. मुलाला मराठी शिकवण्याचा ध्यास घेण्यामागे त्यांची एक विचारसरणी होती. कॅनडामध्ये भारताबद्दल फार गैरसमज आहेत. तेथील टी. व्ही., वृत्तपत्रं इ. प्रसारमाध्यमं भारताबद्दलची माहिती फार विकृत स्वरूपात देत असतात. भारत म्हणजे केवळ झोपडपट्ट्यांचा, भुकेकंगालांचा, अतिशय मागासलेल्या लोकांचा देश, अशी तेथे सार्वत्रिक समजूत आहे. भारतीयांना तेथे फार तुच्छतेनं वागवलं जातं. त्यांच्या मुलाच्या शाळेतही हेच वातावरण आहे. त्यामुळे आपण भारतीय आहोत, हे सांगायला तो कचरतो. आपण आफ्रो-आशियाई आहोत असं तो सांगत असतो. आफ्रो-आशियाई म्हटल्यानं आपला दर्जा थोडा उंचावतो, असं त्याला वाटतं.

बाईंच्या नवऱ्यालाही भारत आणि भारतीय यांच्याबद्दल फारशी आत्मीयता वाटत नाही. त्याच्या आकर्षक व्यक्तिमत्त्वामुळं तो युरोपियनच आहे, असं लोकांना वाटतं. कॅनडातले लोक त्याला स्पॅनिश समजतात, यातच त्याला फार धन्यता वाटते. मराठी भाषक असूनही घरात मराठी बोललेलं त्याला अजिबात चालत नाही. त्याची ही पाश्चात्त्य जीवनाची ओढ बाईंना आवडत नाही.

कॅनडामधली जीवनपद्धतीही बाईंना पसंत नाही. त्यांच्या शेजारच्या भारतीय कुटुंबातली सून अमेरिकन आहे. ती स्पोर्टस्च्या तोकड्या पोशाखात दिवाणखाण्यात येते. पायावर पाय टाकून सोफ्यावर बसते. सासऱ्याशी बरोबरीच्या नात्यानं गप्पा मारत बसते. कधी कधी रंगात आली म्हणजे सासऱ्याच्या डोक्यावर टप्पल मारायलाही कमी करत नाही. सासरा हे निमूटपणे सहन करतो. पण या बाईंना मात्र असलं वातावरण अजिबात आवडत नाही. उद्या त्यांच्या मुलानं अशीच अमेरिकन मुलगी घरात आणली, आणि ती त्यांच्याशी असं वागू लागली तर त्यांना हे आवडणार नाही, असं त्या म्हणतात. त्यांची आई इंग्लंडहून त्यांच्याकडे पंधरा दिवसांसाठी रहायला आली. पण त्यांच्या मुलाचा आजीशी संवाद





अनुक्रमणिका

झाला नाही. भारतात आजी- नातवंडांमध्ये जे मेतकूट असतं तसं त्यांना स्वतःच्या घरात पहायला मिळालं नाही.

बाईंना हा सर्व सांस्कृतिक ऱ्हास वाटतो. आपल्या मुलाच्या बाबतीत तो थोपवण्याचा प्रयत्न करावा असं त्यांना वाटतं, म्हणून त्या त्याला घेऊन पुण्याला बहिणीकडे आल्या आहेत. मुलाला भारतीयपणाबद्दल जो न्यूनगंड वाटतो तो घालवण्यासाठी भारताची सांस्कृतिक समृद्धी त्याला दाखवावी असं त्यांना वाटतं. त्यासाठी त्याला घेऊन त्या भारतभर फिरून आल्या आहेत. दिल्ली, आग्रा, मुंबई, कलकत्ता, सिमला, वेरूळ, अजिंठा इ. सर्व ठिकाणं त्यांनी त्याला दाखवली आहेत. पुण्यामधील गणेशोत्सव, नवरात्र, दिवाळी, इ. सण त्याला दाखवले आहेत. त्यांच्यामागची पार्श्वभूमी समजावून सांगितली आहे. उपक्रमशील अशा ज्ञानप्रबोधिनीसारख्या शाळेत त्याचं नांव घातलं आहे. तेथील शिक्षकांशी त्यांचा संवाद चालू असतो. पण मुलाला मराठी अजिबात येत नसल्यामुळे तो तेथील मुलांमध्ये मिसळू शकत नव्हता. मराठीतून शिकवले जाणारे विषय त्याला समजत नव्हते. आसपासच्या कुटुंबातील मुलांशीही तो खेळू शकत नव्हता. तेव्हा त्याला मराठी आल्याखेरीज त्याला इथल्या सांस्कृतिक जीवनाचा आनंद लुटता येणार नाही, हे लक्षात आल्यावर त्या त्याला घेऊन माझ्याकडे आल्या होत्या. त्यांचे विचार आणि आपली संस्कृती, भाषा याबद्दलचं प्रेम पाहिल्यावर मला कौतुक वाटलं आणि मी त्यांच्या मुलाला मराठी शिकवण्याचं मान्य केलं.

बाईंनी आपल्या मुलाला भारत आणि भारतीय संस्कृती यांच्याबद्दल आत्मीयता वाटावी म्हणून एक वर्षासाठी आपला जीवनक्रम खंडित करण्याचा निर्णय घेतला तो मला कौतुकास्पद वाटतो. लो. टिळकांनी तब्येत सुधारण्यासाठी एक वर्षभर शिक्षणाला विराम देऊन व्यायामावर लक्ष केंद्रित केलं आणि आपली तब्येत सुधारली, याचं आपण कौतुक करतोच की नाही ? तसं सांस्कृतिक कारणासाठी बाईंनी हा जो निर्णय घेतला तोही विशेष म्हटला पाहिजे. आपल्याकडे भाषा शिकणं ही अत्यंत दुय्यम महत्त्वाची बाब समजली जाते. देशाबद्दलचा अभिमान ही शिकण्या-शिकवण्याची गोष्ट आहे आणि त्यासाठी एवढी झीज सोसण्याची तयारी दाखवणं यावर कुणाचा विश्वास बसणार नाही. पण बाईंनी तो वेडेपणा करण्याचं धाडस केलं आहे.

बाईंना स्वतःच्या वास्तवाचं भान आहे. आपल्याला आणि आपल्या मुलाला कॅनडातच जायचं आहे, तिथंच राहायचं आहे, याची त्यांना पूर्ण कल्पना आहे. कॅनडात राहायचं तर तेथील जीवनमानाशी, संस्कृतीशी, भाषेशी फारकत घेता येणार नाही हे त्या ओळखतात. तेथील जीवनपद्धती आपल्याला पटो न पटो, तिच्याशी जुळतं घेतलंच पाहिजे याचंही त्यांना भान आहे. फक्त आपल्या मुलाला भारतीयत्वाबद्दल जो दुरावा वाटतो तो नाहीसा झाला पाहिजे ही त्यांची तळमळ आहे. त्यामुळे भारतात जे जे चांगलं आढळलं ते ते सर्व आपल्या मुलाला दाखविण्याची त्यांची धडपड आहे. भारतातील उज्ज्वल वाङ्मयीन

वारशाची त्याला ओळख करून देण्याची त्यांची धडपड आहे. त्याला रामायण-महाभारतातल्या गोष्टी सांगणं, त्याच्याकडून संस्कृत सुभाषितं पाठ करून घेणं, मराठी संतांची चरित्रं सांगणं, शिवाजी- महाराज, राणा प्रताप यासारख्या शूर पुरुषांची चरित्रं सांगणं हे सगळं त्या तत्परतेनं करतात. आता त्यांच्या मुलाला खूपच चांगलं मराठी यायला लागलं आहे. त्याच्या भोवतालच्या मराठी वातावरणाची त्याला खूपच मदत झाली आहे. इथं आला त्यावेळी त्याला मराठीत बोललेलं अजिबात कळत नसे. पण तो मराठीत गप्पा मारू लागला आहे. स्वतःचे अनुभव चांगल्या तऱ्हेनं मराठीत सांगू लागला आहे. मित्रांशी वादविवाद करू लागला आहे. ही त्याची प्रगती स्पृहणीय आहे. कॅनडात गेल्यावर यातलं काय राहील हे सांगता येत नाही. मराठीचा सराव नसल्यामुळे कदाचित तो मराठी विसरूनही जाईल. पण त्यानं जे भारतदर्शन घेतलं आहे, इथलं जे जीवन अनुभवलेलं आहे, इथल्या लोकांनी त्याला जे प्रेम दिलेलं आहे त्यातल्या चांगल्या गोष्टींचा ठसा त्याच्यावर कायमचा राहणार आहे. कदाचित तपशील विसरला जाईल पण त्याने निर्माण केलेले अनुकूल संस्कार आहेत ते त्याची आयुष्यभर साथ करणार आहेत, यात काही संशय नाही.

**कल्याण काळे**

---

## मग दिसणार कसं

झेन पंथाचे एक वृद्ध धर्मगुरू आपल्या उनाड शिष्यांना नेहमी एक गोष्ट सांगत असत : एकदा एक अंध माणूस आपल्या मित्राकडे गेला होता. तो घरी परत यायला निघाला तेव्हा बरीच रात्र झाली होती, म्हणून तो आपल्या मित्राला म्हणाला, "अरे, मी तुझा कंदील बरोबर घेऊन जाऊ का ?"

"का रे बाबा ? कंदील कशाला ? त्यानं काही तुला जास्त दिसायला लागणार आहे, असं नाही."

"नाही, बहुतेक नाही," तो अंध म्हणाला, "पण इतरांना मी चांगला दिसू शकेन आणि त्यामुळे ते मला धडकणार नाहीत." तेव्हा त्या मित्राने त्याला कंदील दिला.

बांबूच्या काड्यांचा सांगाडा, त्याला वरून कागद आणि आत मेणबत्ती असा तो कंदील घेऊन अंध गृहस्थ घरी निघाला आणि काही पावलं जातोय न जातोय् तोच – कडाड ! कोणीतरी येऊन थेट त्याच्या अंगावरच आदळलं.

अंध गृहस्थाला चांगलाच राग आला. "नीट चालता येत नाही का ?" तो कडाडला, "हा कंदील दिसत नाही ?"

"अरे, पण तू मेणबत्ती पेटवली का नाहीस ? दुसऱ्याने विचारले.

**झेन कूट कथा (प्रेषक : माधवी कोल्हटकर, पुणे)**

# 'देखणा' शब्दाची अर्थपरिवर्तने

**दा. ल. अडोणी**

भाषा ही सामाजिक संस्था-व्यवस्था आहे. समाजात ज्याप्रमाणे कालान्तराने बदल होतात, त्याप्रमाणे भाषेतही होत असतात. भाषेतील बदल हा मुख्यतः शब्दार्थांच्या संदर्भातील फरक असतो. शब्दाच्या बाह्य रूपातील आणि आन्तरिक रूपातील म्हणजे अर्थातील परिवर्तन असे बदलाचे द्विविध स्वरूप संभवते. त्यातही अर्थात झालेला बदल आंतरिक म्हणून सूक्ष्म व महत्त्वाचा ठरतो. नवीन अर्थप्रकार लक्षणीय ठरतात. येथे 'देखणा' शब्दाच्या अर्थविकासाचा मागोवा घेण्याचा, त्याची कालक्रमानुसार पाहणी करण्याचा यत्न करत आहे. उल्लेखाच्या बाजूला असलेली संकेताक्षरे कालनिदर्शक आहेत. ते असे – ज्ञानदेव-स्वर– ; यादवकाल - क वर्ग; बहामनीकाल - च वर्ग; शिवकाल - ट वर्ग; पेशवेकाल - त वर्ग; आधुनिककाल - प वर्ग. उल्लेखांचे स्थलनिर्देश ग्रंथकार व ग्रंथ यांच्या आद्याक्षरांनी सूचित केले आहेत. उदा. –

ज्ञाअ. - ज्ञानदेव अमृतानुभव; मु. परम - मुकुंदराज - परमामृत; कृ. हव. - कृष्णदयार्णव - हरिवरदा; नरु - नरेंद्र - रुक्मिणी स्वयंवर; उ. प्रास. - उत्तम श्लोक - प्राकृत सप्तशती; लाअ - लावण्या-अनंतफंदी, (राम जोशी, होनाजीबाळ) सर्व उल्लेख प्रसिद्ध ग्रंथातील आहेत.

अर्थनिर्णय हा सूक्ष्म विचाराचा विषय असून अर्थप्रकाराच्या निश्चितीत मतभिन्नता संभवते. विगमनात्मक (Inductive) पद्धतीचा अवलंब करून अर्थ हेरण्याचा येथे यत्न केला आहे.

## 'देखणा'

व्युत्पत्ती - सं. दृश् १ प. प्रेक्षणे, पा. दक्खिति - दक्खति, प्रा. देक्खइ, म. देख+णा

शब्दसिद्धी : सं. दृश् (= पाहणे) पासून पाली-प्राकृतद्वारे आलेल्या म. देख धातूला णा हा कर्तृवाचक प्रत्यय लागून 'देखणा' शब्द बनला. हा प्रत्यय विशेषणरूप असल्यामुळे देखणा - णी - णे अशी तिन्ही लिंगी रूपे होतात. देखणे हे प्रा. पेक्ख - सं. प्रेक्ष ह्यांच्या संपर्काने झालेले आहे. (पाहा - पिशल ५५४, टीप १०) – ब्लोक, मभावि. ६३०.१

– दृश् व प्रेक्ष् या धातूंतील अर्थसादृश्य या रूपसिद्धीला उपकारक ठरले असावे.

(१) सं. दर्क्ष्यति, प्रा. दक्खति (दोन्ही भविष्यकाळ)

प्रेक्षते ह्याच्याशी साम्य असल्यामुळे ह्या भविष्यकाळी रूपाला मराठीत वर्तमानकाळी अर्थ आला.

– म. व्यु. कोश, ४५०

– यातील दर्क्ष्यति रूप बरोबर नाही. दृश्‌चे भ. काळी रूप द्रक्ष्यति असे होते. 'दर्क्ष्यति' मुद्रणदोषाने पडले असेल.

(१)

अ मार्गि अंधासरिसा। पुढां देखणाहीं चाले जैसा।
अज्ञा प्रकटावा धर्मु तैसा। जाणतेन॥ ज्ञा. ३.१५५

आ बीजा आणि भूसा। अंधु निवाडु नेणे कां जैसा।
नाव येक देखणा ही तैसा। बरले कां पां॥ ज्ञा. ३.२३०

इ ऐसें बोलौनि देऊ हांसिले। कां गा देखणे यां ह्मणितले।
आह्मीं विश्वरूप तरि दाखविलें। परिं ने दखसि तूं॥ ज्ञा. ११.१५५

उ आधीं चि देखणी दीठि। वरि सूर्यु पुरवि पाठि।
तैं न दिसे ऐसी गोठि। कोठें असे॥ ज्ञा. १८.१७१२

ए सर्वांगें देखणा रवी। परी ऐसें घडे केवीं
जे उदोअस्तूंची चवी। स्वयें घेपे॥ ज्ञा. अ. ७.१९५

ज ब्राह्मण बोले उशापशब्द। क्षण एक होऊनिया अंध।
मागुती चक्षुष्मंत शुद्ध। होसी सर्व देखणा॥ मुआ. २.१०८

**अर्थ** – डोळस, पाहणारा, दृष्टी असलेला.

**विवरण** : देख धातूला कर्तृबोधक णा प्रत्यय बनलेल्या साधित विशेषणाचा हा यौगिक-अवयवसिद्ध अर्थ वाच्यार्थ होय. कित्येकदा या धा. सा. वि. चा (इतरत्र होतो, तसा) नाम म्हणून उपयोग होतो. अर्वाचीन मराठीत या अर्थानें उपयोग होत नाही, असे अशा उल्लेखांच्या अभावी म्हणता येते.

उल्लेख (ए) – 'सर्वांगें देखणा' हे 'रवी'चे विशेषण समर्पक असून ते या अभ्यासाच्या शेवटी येणाऱ्या अर्थचर्चेच्या दृष्टीने लक्षणीय आहे.

(उ) – सामान्यतः व्यक्तीच्या संबंधात प्रयुक्त होणारे हे विशेषण येथे 'दीठि' या देखण्याच्या-पाहण्याच्या इंद्रियाशी व त्याच्या शक्तीशी अन्वित आहे.

वरील उल्लेखात कोठे 'अंध' पद, तर अन्यत्र 'तरीही न दिसण्याचा–पाहण्याचा भाव' हे विरोधी योजना अर्थनिश्चितीस सहायक ठरते.

(२)

अ जो ज्ञानियांचा बापु। देखणेयांचिये दीठी दीपु।
जेया दादुलेयाचा संकल्पु। विश्व रची॥ ज्ञा. ६.१०८

आ आंतु बाहिरि चोखालु। सूर्यु जैसा निर्मलु।
आणि तत्त्वार्थीचा पायालु। देखणा जो॥ ज्ञा. १२.१७९

इ शब्दतत्त्वसारज्ञा। पैं ते चि देखणी प्रज्ञा।

जे क्षेत्रा क्षेत्रज्ञा । अपाडु देखे ॥ ज्ञा. १३.११२३

ॐ जो तू निरालंब साक्षी । निर्लेपक सर्व पक्षीं ।
पारावाररहित निरीक्षी । देखणा तूं होउनी ॥ मु. परम ४.२१

ख द्विजापासौनि देखणे नाही आनः लक्ष्मी बोले तोखे
तेणे भीमकियेचे बोळखिले मनः नरु . ६६८

ट अस्त नाही आतां एकचि मोहोरा पासुनि अंधारा दुरि जालों ॥
साक्षत्वें या जालों गुणाचा देखणा करीं नारायणा तरी खरे ॥ तु. १३९१.६९
ड ज्याणें जडावेगळे आपणा,[१] ओळखिले तो विद्वान व्यतिरेकी शाहणा ॥
पश्यन् पाहणारा देखणा । जो तंतु घेऊनि पटपाहे ॥
तंतूच दिसतो पट । दिसोनि नाही पट निपट ॥
ऐसें जो बोलेल प्रकट । तोचि डोळस देखणा म्हणावा ॥ वा. यदी. ४.७६५, ७६७

**व्याकरण :–** विशेषण (नामासारखा उपयोग)

**अर्थ :–** जाणणारा, ज्ञानी, यथार्थज्ञानी, बुद्धिमान.

**विवरण :–** देखणे म्हणजे पाहणे ही क्रिया दृष्टीच्या, डोळयांच्या द्वारा होणारी असून ती प्रायः मूर्त वस्तूंच्या संबंधात होते, हे (१) ल्या अर्थप्रकारावरून स्पष्ट झाले. चक्षू हे कर्मेंद्रिय नसून ज्ञानेंद्रिय आहे. देखण्याला– पाहणाऱ्याला चक्षूच्या दृष्टीने विषयांचे ज्ञान होते. याप्रमाणे देखणा हा पाहिलेल्या गोष्टीचा आपाततः जाणकार, ज्ञाता ठरतो. या (२) ऱ्या सरणीतील पाहण्याचे विषय बहुतांशी अमूर्त, तत्त्वरूप आहेत. म्हणून (बाह्य, स्थूलरूप) पाहणारा या साक्षात् अर्थाचा बोध होतो व जाणणारा, ज्ञाता असा अर्थ निष्पन्न होतो.

येथील अवलोकनविषय तत्त्वार्थ, क्षेत्र-क्षेत्रज्ञ भेद, परमतत्त्व, मन, गुण असे सूक्ष्म, [२]बुद्धिगम्य आहेत. याप्रमाणे स्थूलाकडून सूक्ष्माकडे, मूर्ताकडून अमूर्ताकडे अर्थाचे संक्रमण झाले आहे. उल्लेख (ड) मध्ये हा 'यथार्थ' स्पष्ट केलेला आहे. पट पाहणार देखणा हा अर्थ (१) मधील असून तंतूच दिसतो पट इ. प्रकट बोलणारा– मूलतत्त्व हेरणारा– डोळस,

---

(१.) काही णा प्रत्ययान्त कर्तृवाचक शब्द – ऐकणा, चालणा, उ. प्रास. ११.४०४. खेळणा– करेरकर 'पूर्व' १५; जागणा-एभा. १२.५७७; धावना-ज्ञा-९.३२१, भाशि. ५०; नाचणी-ज्ञा. ९.३२०, नरु १०५; पाळणा-कृह. ५४.३२०, पोसणा-एभा. १२.५७७, बैसणा-एभा; १२.५७८, राखणा. मो कृवि. ७३८ इ.

(२.) (i) "Not for nothing does 'I see' means 'I understand'. Sight among the senses, easily predominates as a synonym for comprehension, 'seeing is believing".
– I. Goldberg, The wonder of words, p. 86

(ii) ज्ञानवाची सभीं शब्द किसी न किसी स्थूल अनुभव से आए होंगे ।
– डॉ. सक्सेना 'अर्थ विज्ञान', पृ. ९२

देखणा, सूक्ष्म दृष्टीचा म्हणून या (२) च्या अर्थाचा बोधक आहे. पाहणार व डोळस ही संनिध असलेली पदे अर्थभेद ओळखण्यास उपकारक होतात. अर्थ (१ उ) मधील 'दीठी'प्रमाणे (२ इ) मधील 'प्रज्ञा-बुद्धी' ही देखणारी आहे.

याप्रमाणे नेत्रेंद्रियाच्या द्वारे होणाऱ्या क्रियेचे कर्तृवाचक पद हे सूक्ष्म व वैशिष्ट्यपूर्ण अशा मानसिक प्रक्रियेच्या कर्त्याचे बोधक बनले. म्हणून येथे अर्थोत्कर्ष झाला आहे. पाहणे म्हणजे जाणणे ही अनुभवसिद्ध बाब आहे. (पट्) दर्शन (तत्त्वज्ञान), (वैदिक मंत्राचा) द्रष्टा या समकक्ष शब्दांतही असाच अर्थोत्कर्ष आढळतो.

अर्थप्रकार (१) प्रमाणे हा (२) ही सध्या प्रचारात नाही.

(३)

अ हें असो नेणों कैचें। जें डोळांचि पटल रचे।
तेणें देखणेंपण डोलेयांचे। न गीलिजे काइ॥ ज्ञा. ७६१

आ वेदिचें ब्रह्मसूत्र। देखणेंपणें पवित्र।
परि तेयाहि हें क्षेत्र। नेणवेचि॥ ज्ञा. १३६९

ॐ देखणेंचि देखण्यावरी। परतोनि राहे जरी।
तरी दृश्याकार उरीं। कैसेनि होय॥ मु. परम ९.१६

इ मग भटोबासीं . . . . . म्हणितलें: पंडिता: केशव द्या:
सर्वांगी काइ देखणे असें: देखणें तें डोळेनीचि की: स्मृतिस्थळ

ट हातपाय मिळोनि मेळा। चला ह्मणती पाहों डोळा।
देखणी नव्हे देखती कैसे। सकळांचा देखणा डोळा चि असे॥ तु. ४१७४.२
आणि सर्वत्र देखणेंपण। तुझे सर्व सत्यपूर्ण।
ते तुझे स्वप्रकाशलोचन। जननयन–प्रकाशन॥ उ. प्रास. ११६५०

**व्याकरण** – देखणे, देखणेपण –नपुं. देखणी - स्त्री (नाम)

**अर्थ** – डोळयाची पाहण्याची शक्ती, दृष्टी, नजर, ज्ञानदृष्टी, जाणण्याची शक्ती.

**विवरण** – अर्थ (१) मध्ये (पाहणाऱ्या) व्यक्तीला देखणा ते व्यावहारिक दृष्टीने. प्राणी हे देखण्याच्या क्रियेचे अंगीभावाने स्थूल कारण असून निमित्त कारण अंगाची-नेत्रेंद्रियाची अवलोकन शक्ती होय. शुद्धा लक्षणेने हा अर्थ स्फुट होतो. डोळा हा देखणा–पाहणारा, त्याच्या ठायी देखणेपण असते हा भाव उल्लेख (अ, झ, ट) व्यक्तविला आहे. (ॐ) मधील दुसरे देखणे पद दृश्य या पुढील (४) या अर्थाचे तर (ट) मधील (१) ल्या अर्थाचे बोधक आहे

(४)

अ तेवि लचकलिया दीठी। देखणें जे जें उठी।
तेया नाव श्रृष्टी। मी वियें गा॥ ज्ञा. १४८४

ॐ देखणेचि देखण्यावरी। परतोनि राहे जरी।
तरी दृश्याकार उरीं। कैसेनि होय॥ मु. परम ९.१६

ठ ज्ञानदृष्टीचे देखणें। चर्मदृष्टी पाहों नेणें।
अंतरवृत्तीचिये खुणे। अंतरवृत्ति साक्ष॥ रादा ७.४.४८

**व्याकरण** : नाम, नपुं.

**अर्थ** : दृश्य, देखावा, पाहण्याचा – अवलोकनाचा विषय.

**विवरण** : मागील (३) ऱ्या अर्थात देखणे या क्रियारूप नामाचा संकेत कारणावर गेला होता; तर येथे तो कर्मावर–विषयावर गेला आहे. संदर्भानुसार झालेले हे अर्थसंक्रमण पुढील अर्थविकासाच्या दृष्टीने महत्त्वाचे आहे.

उल्लेख (ठ) – (जे) ज्ञानदृष्टीचे देखणे (आहे ते) चर्मदृष्टी पाहो नेणे असा अन्वय.

**(५)**

ठ देखणीं दाखविती आदरें। मंत्र फुंकिती कर्णद्वारें
इतुकेंच ज्ञान तें पामरें। अंतरली भगवंता रादा. ५.२.२९

ठा येक दाखविती देखणी। येक अनुहातध्वनी।
येक गुरु पिंडज्ञानी। पिंडज्ञान सांगती॥ रादा. ५.४.२३

ठि आयुष्य वेचले वाया। तपें दानें तीर्थाटणें।
देखणी आसने मुद्रा। शडचक्र योगधारणा॥ रा. पंचमान, ४.२२

**व्याकरण** – नाम न पुं. (ठा, ठि) या उल्लेखांतील प्रस्तुत पदावरील अनुस्वार गळला नसेल, तर स्त्री लिंग.

**अर्थ** – मोहक दृश्य, भ्रामक देखावा, चमत्कार

**विवरण** – अर्थप्रकार (१) मधून जसा (२) तसा (४) मधून हा (५) वा अर्थप्रकार निघाला. तेथे संकेत स्थूलाकडून सूक्ष्मावर गेला, तर येथे साधारणावरून असाधारण, विलक्षण बाबीवर गेला. येथील आशय वैशिष्ट्यबोधक व विस्मयोत्पादक झाला आहे. सारे उल्लेख रामदासकृत असून मंत्र, सिद्धी यांच्या बळावर दाखवण्यात येणारे चमत्कार त्यात अभिप्रेत दिसतात.

(ण) महाराष्ट्र शब्दकोशात 'येक दाविती देखणीं' दावि ६४ हे अवतरण देऊन 'गुप्त धन, ठेवा' असा अर्थ नमूद केला आहे. यात या (५) व्या अर्थाचे मूर्त रूप प्रतीत होते, असे म्हणता येईल.

**(६)**

ड सदय नृपसमाजामाजि जो देखणा गे।
तदपि तुज तयाच्या सांगतों या खुणा, गे। सारु ८.११७

द जे अन्यायुधांचे कठोर। तीव्र घाते सबळतर

न भंगती सहसा सधर। बहु सुंदर देखणी ॥ उ. प्रास ९.२६२

प महाअभिमानी देखण्या नारी। त्या घरोघर लागल्या दाण्यावरी।
घरधनी वरूनी काठ्या मारी। मग अभिमान कोठे राहिल्या ॥ लाअ. ३०.८५

फ देखणी रति तशी नटली, कल्पना मनांतिल फिटली। लारा. १११

ब सुरतपाक देखणा पुरुष ऐसा, अमृत करं नभोमंडळात जैसा। लाहो. ११९

म कुणी रंक होई कुणी होय राजा, दुजा देखणा हो तिजा
हीन तेजा ॥ माधवानुज १५२९

**व्याकरण** – विशेषण

**अर्थ** – सुंदर; मोहक; आकर्षक; दर्शनीय

**विवरण** – देखणा शब्दाचे हे लक्षणीय–डोळयांत भरणारे अर्थपरिवर्तन होय. देख धातूच्या कर्त्याचा वाचक शब्द हा क्रियेच्या कर्माचा बोधक झाला, हे अर्थ (४) मध्ये दिसून आले. कालान्तराने तो कर्माच्या गुणविशेषाचा द्योतक बनला, हे या सरणीतील प्रस्तुत पदाच्या आशयावरून समजते. एकच शब्द कधी कधी कर्ता व कर्म या दोहोंचाही बोध करतो. इं. Reader शब्द वाचक व वाचनपुस्तक असा उभयार्थी रूढ आहे.

देखणा शब्दाच्या अर्थात एक आणखी संक्रमण झाले आहे. दुसऱ्याकडून पाहिला जाणारा– पाहण्यास योग्य (प्रेक्षणीय) – पाहावयास लावणारा, इतका चांगला– पर्यायाने सुंदर, सुरेख (दर्शनीय) असा अर्थविकास त्यात प्रतीत होतो. या प्रमाणे या देखण्यामधील गुणविशेष - पाहण्यालायक रूपविशेष वरील उल्लेखात अभिप्रेत असल्यामुळे येथे अर्थाचे विशेषीकरण आणि व्यक्तीच्या सौंदर्याचा प्रत्यय येतो, म्हणून अर्थोत्कर्ष झाले आहेत.

## ऐतिहासिक दृष्टीने पाहणी

देखणा शब्द 'सुंदर' या अर्थाने शिवकालापासून उपयोगात आला, असे या अभ्यासातील उल्लेखांवरून दिसले. एकनाथांनी भावार्थ रामायण व भागवत या ग्रंथांत या शब्दाचा बहुवार प्रयोग केला आहे. अर्थनिश्चितीच्या दृष्टीने अशी पाहणी उपयुक्त ठरेल, असे वाटते.

च हे वाग्विलास परमेश्वरि। सर्वांग देखणी सुंदरीं।
राहोनि बाह्याभ्यंतरी। ग्रंथार्थकुसरी वदवी स्वयें ॥ एभा. १.२५

चा नाचे स्वानंदाचेनि मेळें। तेणे सर्वांगीं निघाले डोळे।
पिसें देखणीं जाहलीं सकळें। तीं शिरीं गोपाळें वाहिलीं। एभा. ११.३

ज विश्व अवलोकी विश्व देखणा। तंव गांजिली देखिली पांडवांगना।
दुःशासन झोंबे वसना। निरी हातें आसुडीत ॥ मुस. १५.१८६

या उल्लेखातील प्रस्तुत शब्दाचा अर्थ 'मोहक-सुंदर' असा (प्रचलित असलेला) प्रतीत होतो. परंतु

| | | |
|---|---|---|
| चि | तेणे अवस्थेवीण जीवविलें। मृत्यूवीण मरणाचि मारिलें।<br>दृष्टि देऊनि दाखविलें। देखणे केले सर्वांग ॥ | एभा. १८२ |
| ची | इंद्रा अहिल्येशीं व्यभिचारु। तुज वृंदेशी दुराचारु।<br>इंद्र जाहला सहस्त्रनेत्रू। तूं सर्वांगें सर्वत्र देखणा ॥ | एभा. ५.१२ |
| चु | जानकीचे देखणे नेत्र। सांडोनिया क्षराक्षर।<br>भूतमात्र देखे अक्षर। चिदचिन्मात्र श्रीराम ॥ | एरा. ४.१३.५९ |
| जा | सर्वां सर्वत्र तुझे कान। सर्व देखणे तुझे नयन।<br>आज कां नायकशी वचन। एवढें व्यसन न देखशी ॥ | मुस. १५.१५६ |

(चि) बापट प्रतीत 'दृष्टि घेऊनि' असा पाठ आहे. तदनुसार पहिल्या दोन चरणांतील विरोधभावात जुळणारा अर्थ पुढीलप्रमाणे होईल – (जनार्दनस्वामींनी माझी इहपर) दृष्टी काढून घेऊनं (मला सारे काही) दाखविले. सांगोपांग अन्तर्बाह्य ज्ञान प्राप्त करून दिले. दृष्टी अन्तर्मुख करवून 'सर्व खल्विदं ब्रह्म' याची जाणीव करून दिली.

(ची) 'तू सर्वांगें सर्वत्र देखणा' – सर्व अंगांनी. बाजूंनी (तू) किंवा सर्व काही, पूर्णपणे (द्वितीया विभक्ती) देखणा म्हणजे सुंदर असा अर्थ केला, तर तो 'सर्वत्र' या क्रियाविशेषणाच्या संबंधात जुळत नाही. सर्वत्र म्हणजे यच्चयावत पाहणारा– पर्यायाने जाणणारा असा भाव. 'सर्वांगें देखणा' हा शब्दबंध अमृतानुभवातही योजिला आहे. मागे (१३) पहा.

## अवलोकन

देखणा शब्दाच्या अर्थात झालेली विविध परिवर्तने लक्षणीय व उद्‌बोधक आहेत. शब्द कसे अनेकार्थक असतात याचे हे एक चांगले उदाहरण आहे. हा शब्द वक्त्याच्या विवक्षेप्रमाणे व प्रसंगानुरोधाने कर्ता, कर्म, करण, क्रिया व गुण यांचा आणि स्थूल व सूक्ष्म-बाह्य आणि आन्तरिक बाबींचा बोधक कसा होतो, हे अनेक उल्लेखांच्या आधारे पाहिले.

इतके विविध अर्थ ज्यातून प्रतीत झाले, त्या शब्दाचा एकच गुणद्योतक अर्थप्रकार आज प्रचलित आहे. (६) वे 'सुंदर, मोहक' हे अर्थपरिवर्तन इतर अर्थांच्या मुळावर आले असे म्हणता येते. ऐतिहासिक दृष्टीने पाहिले, तर एकनाथी साहित्यात या अर्थाने मूळ धरले. त्यांच्या व मुक्तेश्वरांच्या रचनेत (६) व्या प्रमाणे (२) ऱ्या ही अर्थप्रकाराचा आढळ होतो. उत्तरपेशवाईपासून - विशेषतः शाहिरी वाङ्मयात देखणा– णी शब्दाचा केवळ 'सुंदर, मोहक' या अर्थाने उपयोग होऊ लागला व अर्थादेश झाला. इतर अर्थप्रकार माजी-कोशगत झाले असून आधुनिक मराठीत हा मुख्यार्थ झाला आहे.

अर्थप्रकार (२) – 'जाणणारा, ज्ञाता, यथार्थज्ञानी, बुद्धिमान' हा महाराष्ट्र शब्दकोशात नमूद केला नाही.

**एच् १/४४४, लक्ष्मीनगर, महा. गृहनिर्माण परिसर, पुणे ४११ ००९.**

# सल

मनोहर राईलकर

नेहमी ज्याला काट्याकुट्यांतून तेही अनवाणी चालावं लागतं, त्याला त्या काट्यांचीही सवय होते असं म्हणतात. काट्यांचा त्याला त्रास तर होतच नाही, उलट त्यांच्या पायांचे तळवे इतके निबर होतात, की काटे त्यांच्या पायात घुसण्याऐवजी स्वतःच मोडून पडतात.

पण याउलट साधं सारवलेल्या अंगणात जातानासुद्धा पायात काहीतरी घातल्याशिवाय चालणं काहींना अवघड जातं. बारीकसा रेतीचा खडासुद्धा त्यांच्या पायांना रुपतो अन् खुपतो.

अलीकडच्या मराठीच्या वाटासुद्धा हिंदी-इंग्रजीच्या काट्याकुट्यांनी भरल्यासारख्या झाल्या आहेत. काहींच्या मनाचे तळवे (शब्द बरोबर आहे ना ?) इतके निबर झाले असावेत की त्यांना हे काटेकुटे जाणवतच नसावेत. पायाचे तळवे निबर झालेले कदाचित चांगलंही असेल. पण मनाचेही तळवे निबर व्हावेत का ?

आजकाल जीवन अतिशय वेगवान झालं आहे. वृत्तपत्रांना टेलिप्रिंटर किंवा टेलेक्सवरून ज्या इंग्रजी बातम्या मिळतात, त्यांचं मराठी रूपांतर तडकाफडकी करून द्यावं–घ्यावं लागतं. आणि सवड तर फारच थोडी असते. त्यामुळे त्यांचं मराठी, इंग्रजीच्या सोऱ्यातून चकलीसारखं काटेरी होऊनच बाहेर पडतं. आपण मराठी (म्हणून) लिहून काढलेला मजकूर मराठीच आहे की नाही हे पाहायला वेळच नसतो.

दिवाळीच्या आधी लेखकांना कितीतरी कथा पाडायच्या असतात. आणि अवधी किती थोडा ! मग त्यांचं मराठीसुद्धा इंग्रजीच्या चाकोरीतून धावू लागतं.

वृत्तपत्रं, मासिकं आणि दूरदर्शनसुद्धा, इंग्रजी कंटकमिश्रित मराठीचा असा काही मारा सातत्यानं आपल्यावर करीत असतात, की काही विचारू नका. पेपरांचा गठ्ठा तपासून झाल्यावर शिक्षकांना जसं आपल्याच ज्ञानाच्या सच्चेपणाबद्दल डळमळायला होतं, तसं हल्लीचं मराठी वाचता-ऐकताना होतं.

**भूतभूतकाळ :**

अ) १९९१ च्या दिवाळी अंकातला एक उतारा :

शरदनं खांदे उडवले होते. मंदाबरोबर वाद घालण्यासाठी त्याला वेळ नव्हता. आठ चाळीसची फास्ट त्याला पकडायची होती. बकाबका त्यानं न्याहरी केली होती. आणि मंदाला तयार राहण्यास सांगून तो दिवाणखान्यात आला होता. बुटाची लेस बांधत असतानाच त्याने मंदाला हाक मारली होती. (कथेतील नावं बदलली आहेत.)

या परिच्छेदात सहा वाक्यं आहेत. पैकी हो धातूच्या चार रूपांखाली रेघ आहे. या

रूपांची आवश्यकता आहे ? ती गाळून परिच्छेद वाचून पाहावा. अर्थामध्ये काहीही फरक पडणार नाही. इंग्रजीमधल्या past perfect चं हे अंधानुकरण नव्हे का ? जिथं साधा भूतकाळी प्रयोग अपेक्षित आहे, तिथं भूतभूत का ? (मीच निष्कारण भूतभूत म्हणून ओरड करीत नाही ना ?)

ज्यावेळी भूतकाळी प्रयोगातच एखादं भूतकाळी निवेदन करायचं असेल त्यावेळी हो च्या अशा रूपांचं आगमन समर्थनीय ठरेल. आवश्यकही असेल. उदा. 'मी गेल्याच वर्षी तुला सांगितलं होतं.'

'आपण फसले गेलो' हे वाक्य we have been deceived या वाक्याचं पण इंग्रजी वळणाचं भाषांतर नव्हे का ? त्यापेक्षा आपण फसलो हे मराठी वळणाचं भाषांतर का केलं जात नाही ?

**इंग्रजी लोकाचार :**

इंग्रजी भाषेत त्या त्या संस्कृतीला अनुसरून जे जे वाक्प्रयोग रूढ झाले असतील त्यांचं जसंच्या तसं भाषांतर करणं कितपत योग्य ठरेल ? पुढील वाक्यं पाहा.

(अ) मी स्वतःला केव्हाच क्षमा केली नसती.

(आ) ईश्वराचे आभार !

(इ) हास्याच्या गदारोळात ते उत्तरले.

(ई) त्यानं शेवटचा अयशस्वी प्रयत्न केला.

(उ) ईश्वर मृतात्म्यास शांती देवो.

(मृताबद्दल वाईट बोलू नये असं म्हणतात. पण मला वाटतं वाईट मराठीसुद्धा बोलू नये !)

पहिल्या वाक्याबद्दल बोलायचं तर, 'मला ते नेहमी सलत राहिलं असतं' अशा प्रकारची एखादी वाक्यरचना का केली जात नाही ?

ईश्वराची कृपा हे स्मरत नाही का ?

मरणोत्तर काय होतं हा ज्याच्या त्याच्या श्रद्धेचा प्रश्न आहे. पण ज्याअर्थी 'ईश्वर मृतात्म्यास शांती देवो' हे म्हटलं जातं त्याअर्थी ते काहीच न समजता, आंधळेपणानं केवळ इंग्रजीवरून भाषांतर करूनच म्हटलं जातं हे सरळ आहे. श्रद्धा असेल तर मग निदान 'ईश्वर मृतात्म्यास सद्‌गती देवो' असं मराठी हिंदूंनी म्हणणं जास्त सयुक्तिक नव्हे का ?

आधी हास्याचा गदारोळ की आधी उत्तर ? इंग्रजीत रूढ झाला आहे म्हणून आपणही आंधळेपणानं तो वाक्प्रयोग उचलावा का ?

मुद्दाम कुणी अयशस्वी प्रयत्न करतात का ?

'त्याचे हाल कुत्रासुद्धा खाईना' याचं इंग्रजी भाषांतर not even a dog eats his troubles असं केलं तर आपण ते हास्यास्पद मानतो. पण मग आपणही वरील वाक्यांत कमीअधिक प्रमाणात तेच करतो आहोत की नाही ?

चिं. वि. जोशींनी विनोदनिर्मितीसाठी इंग्रजी वळणाप्रमाणं मुद्दाम अशा काही वाक्यांची पेरणी केली होती. त्यांनी जर आज ही वाक्यं वाचली तर आपली गादी चालवणारे खूपच लोक मराठीत आहेत असं समाधानही त्यांना स्वर्गात वाटेल.

**भाषांतराच्या तऱ्हा :**

वृत्तपत्रं तर भाषांतर करूनच बातम्यांचं संपादन करीत असतात. आणि आपण लिहिलेल्या मजकुराकडे एकदा नजर टाकण्याइतकीसुद्धा सवड त्यांना नसते. ते समर्थनीय नसलं तरी आपण समजू शकतो. अनेक कथा, कादंबऱ्या, नाटकं, दूरदर्शनमालिका वगैरे ललित कलाकृती सरळ सरळ इंग्रजी-हिंदीवरून बेतलेल्या असतात. काही वेळा मूळ कलाकृतींचा उल्लेख असतोही. पण तसा नसला तरी त्यातल्या वाक्यरचनांवरून उचलेगिरी सहज लक्षात येण्यासारखी असते. खाली काही वाक्प्रयोग दिले आहेत.

अ) मी त्याची काहीच मदत करू शकलो नाही.

आ) मी परिस्थितीचा सामना केला.

ही दोन्ही वाक्यं हिंदीमधून मराठीत काट्यासारखी घुसून बसली आहेत. पहिल्या वाक्यातील अधोरेखित शब्दाऐवजी त्याला आणि दुसऱ्या वाक्यात परिस्थितीशी असे शब्द हवेत असं नाही वाटत? हा उचलेगिरीचा परिणाम असेल अथवा हिंदी-इंग्रजी वाचनाचा नकळत झालेला परिणाम असेल. पण अशा वाक्यरचना मराठीत आपल्या हातून नकळत होऊन जातात, हे खरं.

(इ) गाडीतील सर्व दहा उतारू ....

यातला 'सर्व दहा' हा प्रयोग इंग्रजीच्या all ten चं भाषांतर आहे. लिहिणाऱ्याला दहाच्या दहा हा प्रयोग आठवला नाही का?

(ई) ३ दशलक्ष रुपये ....

तीस लक्ष रुपये का लिहिलं जात नाही? हे तर सरळ सरळ million चं भाषांतर. एकं, दहं, ... या गणनेत लक्ष, दशलक्ष इ. येत असले तरी एरवीच्या वाक्यरचनेत ते अपेक्षित नाही.

(उ) अपघाताची जागा ६० मीटर पुढे आहे.

हे वाक्य तर मराठीचा सरळ सरळ खून आहे. accident spot 60 meters ahead या इंग्रजी वाक्याचं हे चुकीचं भाषांतर आहे. जणू काही कुणी अपघाताची जागाच शोधत आहे. आणि या पाटीमुळे त्याला योग्य (?) ते मार्गदर्शन मिळतं आहे! अरे बाबा, अपघात करायचाय ना तुला? मग तो इथं नको करूस. त्यासाठी पुढं ६० मीटरवर खास जागा ठेवली आहे, तिथं कर.

**गौण वाक्यांचं स्थान :**

जो, जे, ज्याला, इ. शब्दांनी सुरू होणारी वाक्यं, म्हणजे गौण वाक्यं आधी आणि त्यांच्याशी संबंध असणारी मुख्य वाक्यं मराठी वाक्यरचनेत नंतर यायला हवीत असं

मला वाटतं. पण हिंदी-इंग्रजीवरून, डोळे मिटून, म्हणजे मराठीची प्रकृती ध्यानात न घेता लिहिणाऱ्यांना त्याचं काय ?

(अ) आजच्या पाहुण्यांचं मी स्वागत करतो, जे आपल्या नगराचं भूषण आहेत.

(आ) मी सातव्या पंचवार्षिक योजनेविषयी लिहिणार आहे, जिच्यात शिक्षणाकरता फारशी तरतूद नाही.

मी वरील वाक्यांत स्वल्पविराम तरी घातला आहे. पण कित्येकदा त्याचाही अभाव असतो. असली उदाहरणं जागोजाग आढळतील.

**चुकीचे अर्थ :**

एका शब्दाचे अनेक अर्थ असतात. तसं मराठीत घडतं आणि इंग्रजीतही घडतं. खरं तर सगळ्याच भाषांत घडत असणार. माणसाची कल्पनाशक्ती आणि उपलब्ध असलेली भाषा यांच्या स्पर्धेत काही झालं तरी मागंच पडणार, म्हणून तर भाषांतर करणाऱ्यानं आपण योग्य अर्थाचाच प्रतिशब्द वापरला आहे की नाही, याकडे ध्यान ठेवलं पाहिजे, नाहीतर अर्थाचा अनर्थ होऊ शकतो.

(अ) Weight या शब्दाचा अर्थ वजन असला तरी, Don't give him any weight, या वाक्याचं भाषांतर करताना त्याला वजन देऊ नका असं म्हणणं बरोबर कसं ठरेल ? इथं महत्त्व असा शब्दच हवा. तुमच्या शब्दाला त्या ठिकाणी वजन आहे, या वाक्यात तोच अर्थ अपेक्षित आहे. पण म्हणून सरसकट weight करता वजन हा शब्द चालेल का ?

इंग्रजीत state या शब्दाला अनेक अर्थ आहेत. एक आहे अवस्था, दुसरा आहे राज्य. पण जिथं राज्य असा अर्थ हवा असेल तिथं अवस्था शब्द वापरला, तर अनवस्था होईल.

(आ) Irregular करता अनियमित हाही शब्द आहे तसा नियमबाह्य हाही शब्द आहे. पण His behaviour is irregular, या वाक्याचं भाषांतर त्याचं वर्तन अनियमित आहे, असं वाचायला मिळतं. इथं, त्याचं वर्तन नियमबाह्य आहे, असं हवं, असं मला वाटतं. याउलट भूमितीमधली एखादी आकृती, समजा षट्कोन, हा नियमबाह्य नसून अनियमित आहे असं म्हणायला पाहिजे.

(इ) मुख्यमंत्र्यांचं म्हणणं प्रश्नकारक आहे, यातला प्रश्नकारक हा शब्द questionable साठी वापरला आहे हे स्पष्ट आहे. शंकास्पद किंवा अविश्वसनीय हे शब्द उपसंपादकांना सुचले नसावेत.

(ऊ) कोणत्याही किमतीवर इमारत पाडणार यातील कोणत्याही किमतीवर हे कशाचं भाषांतर असावं ? At any cost याचं की For any price, याचं ? कोणतीही किंमत द्यावी लागली तरी असं भाषांतर मराठी नाही असं नाही का वाटत ?

(ए) एस्टीच्या कंडक्टरकरता वापरला जाणारा वाहक हा शब्द योग्य नव्हे. वीज

अथवा उष्णता वाहून नेण्याचा गुणधर्म ज्या पदार्थांकडे असतो त्यांना विजेचे किंवा उष्णतेचे वाहक म्हणतात. पण इंग्रजीमधल्या conductor या शब्दाचा अर्थ हा एकच अर्थ आहे काय? वाद्यमेळाचं, परीक्षेचं, सार्वजनिक समारंभांचं नियंत्रण करणाऱ्या व्यक्तीलाही conductorच म्हणतात. आणि एस्‌टीचा कंडक्टरसुद्धा काही एका अर्थानं नियमनच करीत असतो. खरं तर वाहून नेण्याचं काम ड्रायव्हरच करतो. तेव्हा त्यालाच वाहक म्हणायला पाहिजे.

तू वाहक की मी वाहक? असा गोंधळ ड्रायव्हर आणि कंडक्टर यांच्यात कसा झाला होता, त्याचा एक गमतीदार किस्सा या लेखाच्या संदर्भात प्रा. मा. ना. आचार्यांनी मला सांगितला होता.

याच चालीवर कमिशनरकरता मला दलाल हा शब्द सुचतो! कारण कमिशनचा एक अर्थ दलाली असा आहे नाही का? पटतो?

चपखल प्रतिशब्द आपल्या भाषेत नसेल आणि ज्यासाठी आपण तो वापरणार आहोत ती संकल्पनाच जर आपण दुसरीकडून उसनी घेतली असेल, तर तोच शब्द जसाच्या तसा किंवा आपल्या भाषेप्रमाणं वाकवून घ्यायला काय हरकत असावी? नाहीतरी वाहक हा शब्द कागदोपत्रीच राहिला आहे. व्यवहारात तो कुणीच वापरत नाही. तेव्हा, चुकीचं भाषांतर करू नये, एवढंच मला इथं सुचवायचं आहे.

चुकीच्या शब्दयोजनेचं एक गमतीदार उदाहरण सांगण्यासारखं आहे. संगणकाच्या परिभाषेत, संगणकाला दिलेल्या आदेशातील दोषाला किंवा चुकीला bug म्हणतात. पण उपसंपादकाच्या डुलकीमुळं, 'संगणकात ढेकूण शिरल्यामुळं चुकीची बिलं दिली गेली', अशी बातमी वाचायला मिळाली.

पुण्यातल्याच एका हॉस्पिटलनं Free time for visitors याचं मराठी रूपांतर 'भेटण्याची विनामूल्य वेळ' असं केलं आहे!

लहानपणी एकमेकांना विनोद म्हणून आपण ऐकवलेलं Foxfloodची mangowoman you me bread या वाक्याच्या धर्तीचाच विनोद वरील वाक्यांमुळं होतो.

**मराठी वि. इंग्रजी :**

एखादी वाक्यरचना इंग्रजीत चुकीची आहे म्हणून आपल्याला मराठीतही ती चुकीची वाटू लागली आहे, असं कित्येकदा आढळतं. आणि ती तथाकथित चुकीची वाक्यरचना दुरुस्त करण्याचाही प्रयत्न केल्याचं दिसून येतं. एका भाषेत बरोबर पण दुसऱ्या भाषेत चूक असं असण्यात काहीच नवल नाही.

(अ) ख ने खच्या वडिलांना भेटावं असं क त्याला सांगतो आहे असं समजू. त्या दृष्टीनं You see your father, या वाक्यात your हे बरोबर आहे. पण मराठीत 'तू तुझ्या वडिलांना भेट', असं म्हणणं म्हणजे इंग्रजीचं अंधानुकरण आहे. 'तू आपल्या





अनुक्रमणिका

वडिलांना भेट,' हेच मराठीला अनुसरून होईल. या वाक्यात थोडी संदिग्धता आहे. पण संदर्भावरून ती दूर होण्यासारखी आहे.

(आ) My clothes are superior to you हे वाक्य इंग्रजीत चुकीचं समजलं जातं. कारण त्यात चुकीच्या वस्तूंमध्ये तुलना होते. पण म्हणून मराठीमधलं, 'माझे कपडे तुझ्यापेक्षा चांगले आहेत', हेही चुकीचं समजलं जातं आणि 'माझे कपडे तुझ्या कपड्याहून चांगले आहेत', असं दुरुस्त करून लिहिण्यास फर्मावलं जातं.

इंग्रजी आणि मराठी यांच्या वाक्यरचनेतील वेगळेपणा लक्षात न घेतल्यामुळं असं होत असावं.

**शब्दांचं सान्निध्य :**

इंग्रजी व्याकरणात juxtaposition नावाचा प्रकार शिकावा लागे. कोणते शब्द शेजारी आले पाहिजेत याचे काही नियम किंवा संकेत सांगितले जात. तसे ते पाळले नाहीत तर कसा अनर्थ होऊ शकतो यासाठी एक उदाहरण सांगितलं जात असे. For a sale a piano, of a lady with three legs, ebonite case . . . इ. वृत्तपत्रातल्या मराठी लेखनामध्येही, असं भान न ठेवल्यामुळं असेच घोटाळे होतात असं आढळतं.

(अ) . . . यास आज सकाळी ठाणे पोलिसांनी खोटा पत्ता देऊन बनावट पारपत्र मिळवल्याबद्दल अटक केली. एकीकडे, पासपोर्ट या शब्दाकरता अगदी शुद्ध मराठी शब्द वापरत असता दुसरीकडे, आपण किती अनर्थकारक वाक्यरचना करून गेलो याचं भान लिहिणाराला राहिलं नाही.

थोडक्यात, अपराध कुणाचा आणि अटक कुणाला !

(आ) न्या. यांनी चोरी केल्याबद्दल . . . ला शिक्षा ठोठावली. तोच नमुना.

(इ) ५० लाखाहून अधिक खपलेल्या या पुस्तकाचे तेव्हाचे अध्यक्ष रोनाल्ड रेगन यांनी स्वागत केले होते.

रोनाल्ड रेगन हे पुस्तकाचे अध्यक्ष आहेत काय ?

(ई) मेगॅसी-४० नामक जर्मनीमध्ये तयार झालेल्या गोळ्या.

(उ) १००० फूट व्यासाचे ५००० प्रेक्षक बसतील एवढे. . . .

(ऊ) राज्य सरकारच्या सहकार्याने वाया गेलेला वेळ भरून काढून आता वेगाने काम होईल . . . (ही वस्तुस्थिती तर नव्हे ?)

**वाक्याची लांबी :**

फार मोठी वाक्यं मराठीला झेपत नाहीत. इंग्रजीत, एकाच वाक्यात अनेक शब्द असतात. परस्परांशी फारसा संबंध नसलेले अनेक तपशील एकाच वाक्यात कोंबण्याची पद्धत इंग्रजीला शोभूनही दिसत असेल. पण तसलं मराठी कधी कधी अनाकलनीय होतं. इंग्रजीवरून भाषांतर करून लिहितानाच बहुधा असं होत असावं. स्वतंत्र लिखाणात कदाचित तसं होणारही नाही. हे वाक्य पाहा. –





अनुक्रमणिका

(अ) पूर्वी प्लंबर आणि इन्शुरन्स सेल्समनचे काम करणाऱ्या आणि सध्या जगातील सर्वात जास्त पैसे मिळवणारा लेखक असलेल्या क्लॅन्सीच्या म्हणण्याप्रमाणे इंटेलिजन्स विभागात काम करणाऱ्या गुप्तहेराला जेम्स बाँडप्रमाणे गाड्या उडवणे, सुंदर रमणींच्या तांड्याबरोबर हिंडणे, गुंडांचा समाचार घेणे, या साऱ्या करामती करणे शक्य होणार नाही.

अबब ! या वाक्यात परस्परांशी फारसा संबंध नसलेल्या किती बाबींची माहिती एकत्र कोंबली आहे ! (१) क्लॅन्सी पूर्वी कोण होता त्याचा तपशील; (२) सध्या तो काय करीत आहे याचा तपशील आणि उपतपशीलसुद्धा; (३) जेम्स बाँड जसं करतो तसं करता येणार नाही, हे त्याचं मत.

हे वाक्य इंग्रजी लेखाचं भाषांतर करताना लिहिलं गेलं आहे हे उघड आहे. पण लेखकानं जर तीन वेगवेगळी वाक्यं केली असती तर वाचकांना ते समजण्यास सोपं, त्यामुळं सुखाचं झालं नसतं का ?

(आ) स्तिमित करणारा पंखांचा विस्तार असणारा महाकाय पक्षी पुण्याच्या सर्पोद्यानात शुक्रवारी दाखल झाला.

ही माहिती देताना दोन वाक्यं केली असती तर ? (१) पुण्याच्या कात्रज सर्पोद्यानात शुक्रवारी एक महाकाय पक्षी दाखल झाला. (२) त्याच्या पंखांचा विस्तार स्तिमित करणारा होता.

म. गांधी फार चांगलं इंग्रजी लिहीत आणि बोलत असत. . . चांगलं म्हणजे सोपं. सोपं या शब्दाला अनेक छटा असतील. तूर्त त्यातली एकच छटा महत्त्वाची आहे. त्यांच्या लिखाणातली आणि बोलण्यातली वाक्यं लहान लहान असत. एकाच वाक्यात अनेक शब्द, अनेक तपशील देण्यामुळं कदाचित पांडित्य-प्रदर्शन होत असेल. पण, वाक्यातला पहिला शब्द आणि शेवटचा शब्द या दोहोंमध्ये अनेक संदर्भ असतील, तर ते सारे लक्षात घेणं कठीण असतं. एवढ्या मोठ्या वाक्याचा अर्थ लावणंही अवघड जातं की नाही ? चांगलं भाषण, चांगलं लेखन यांतील भाषा या दृष्टीनं विचार केला तर वाक्य लहान असणं हा एक गुण ठरेल.

**शेवटचा सल :**

मी कुठल्याच भाषेचा तज्ज्ञ नाही. मराठीचासुद्धा नाही. भाषाशास्त्राचा तर नाहीच नाही. पण मराठीचा वाचक, थोडासा लेखक, या नात्यानं मला खटकलेले, सललेले काही भाषा–प्रयोग मी इथं मांडले आहेत. वर्षानुवर्षं इंग्रजीतून वाचन आणि लेखन केल्यामुळं माझ्या हातूनही अशा प्रकारचे प्रमाद घडले असतील. कुणी सांगावं ?

एकच खंत वाटते. आपल्याला इंग्रजी अगदी अचूक, शक्य तर अमेरिकन धर्तीचं, यावं असं पुष्कळांना वाटत असतं. पण मराठी अचूक यावं याची जराशीही काळजी घ्यावी असं का वाटत नाही ? तसं वाटत असतं तर अमरण, अबालवृद्ध, अश्वासन, पुनर्प्रक्षेपित (पुर्नप्रक्षेपितसुद्धा), वगैरे वाक्प्रयोग का आढळले असते ?

आगखीही काही सल माझ्या मनात आहेत. पण तूर्त एवढ्याबद्दलच जाणत्यांकडून समजून घ्यायची इच्छा व्यक्त करून लेख संपवतो.

**गजांजली, ४६ वाळवेकर इस्टेट, पुणे ४११ ००९.**

---

## मुद्रण प्रथम : आवृत्ती तृतीय

तेत्सुगेनच्या काळात चिनी भाषेतले पवित्र बौद्ध धर्मग्रंथ जपानी भाषेत उपलब्ध नव्हते. आपल्या देशबांधवांसाठी ते जपानी भाषेत प्रकाशित करावेत, असी तेत्सुगेनची फार इच्छा होती. त्यासाठी लाकडी ठोकळ्यांवर आधी हातांनी मजकूर कोरून घेऊन त्यावरून त्यांच्या हजारो प्रती काढाव्यात, असे त्याने ठरवले. या महान् प्रकल्पासाठी तो गावोगाव हिंडून देणग्या गोळा करायला लागला. जवळजवळ दहा वर्षांनी पुरेसे पैसे जमा झाल्यावर त्याने लाकडाचे ठसे तयार करून घ्यायला सुरुवात केली.

नेमक्या याचवेळी उजी नदीला पूर येऊन सगळीकडे ओला दुष्काळ पडला. जमा झालेले सगळे पैसे घेऊन जाऊन तेत्सुगेनने दुष्काळग्रस्त लोकांसाठी तांदूळ विकत आणला. नंतर आपल्या कामासाठी त्याने पुन्हा निधी जमवायला सुरुवात केली. देणगी पैपैशाची असो की सुवर्णमुद्रांची, देणाऱ्याबद्दल त्याच्या मनात सारखीच कृतज्ञता असायची. अशी काही वर्षे गेली आणि पुन्हा त्याच्याकडे पैसे जमले.

तेवढ्यात देशात साथीचा रोग पसरला. हजारो कुटुंबे त्यात निराधार झाली. तेव्हा जमलेला सगळा निधी तेत्सुगेनने त्या असहाय लोकांना वाटून टाकला. साथीचे निर्मूलन होऊन सगळे स्थिरस्थावर झाल्यावर त्याने पुन्हा नव्याने निधी जमवायला सुरुवात केली.

अखेरीस एकदा त्याचा तो महान् प्रकल्प पुरा झाला आणि त्याने समाधानाने प्राण सोडला. पवित्र धर्मग्रंथांची तेत्सुगेनने काढलेली ही जपानी आवृत्ती आपल्याला आजही पहायला मिळते. पण ज्यांना तेत्सुगेनची ही कहाणी माहिती आहे, ते मात्र म्हणतात, "तेत्सुगेनने काढलेल्या पहिल्या दोन आवृत्त्या या तिसऱ्या आवृत्तीपेक्षा कितीतरी सरस होत्या !"

**झेन कूट कथा (प्रेषक : माधवी कोल्हटकर, पुणे)**





अनुक्रमणिका

# एका शब्दाचा मृत्युलेख

दु. का. संत

वृत्त – संपादकांना व्यक्तीचे पत्र, लहानमोठ्या स्त्री-पुरुषांचे दु:खद निधन झाल्याबद्दल मृत्युलेख लिहावे लागतात. व्यक्तीच्या कर्तृत्वाविषयी, व्यक्तिमत्त्वाविषयी समाजाला जो जिव्हाळा वाटत असतो, आपलेपणा उचंबळून येत असतो त्याचे प्रतिबिंब या मृत्युलेखांतून पडलेले आढळते.

या ठिकाणी सर्वसामान्य लेखक म्हणून शब्दांविषयी जो आपलेपणा असतो त्याच्यापोटी एका शब्दाच्या संदर्भात हा मृत्युलेख लिहीत आहे. तो कोणाही एका व्यक्तीवर नाही, दुर्दैवाने अस्तंगत झालेल्या एखाद्या प्रतीकाचा नाही, तर आपल्या राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्यात व समाजात अनन्य महत्त्वाचे स्थान प्राप्त करून देणाऱ्या तसेच महात्मा गांधी आणि भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर या व्यक्तींच्या संदर्भांनी पुनीत झालेल्या "हरिजन" या शब्दाच्या अंतासंबंधीचा हा लेख आहे.

नुकतीच वर्तमानपत्रांतून एक बातमी येऊन गेली, की महाराष्ट्र शासनाने 'हरिजन' या शब्दाचा पर्याय म्हणून 'दलित' हा शब्द मान्य केला आहे. विशेषत: ज्या मागासवर्गीय विद्यार्थ्यांना फी आदी सवलतींच्या संबंधात भरावे लागणारे फॉर्म, तसेच करावा लागणारा पत्रव्यवहार आदींत 'हरिजन' हा शब्द न वापरता 'दलित' शब्द वापरला तरी तो स्वीकार्य ठरेल. याचा अर्थ, 'हरिजन' या शब्दाचे महत्त्व तसे इतिहासगत झाले, याचा परिणाम म्हणजे त्या शब्दाचा मृत्यूच सरकारी राजपत्राद्वारे जाहीर झाला. म्हणून हा मृत्युलेख !

अति महत्त्वाच्या व्यक्ती व तशाच घटना यांच्याशी एवढा स्पष्टपणे संबंधित असलेला व एका परीने भावभावनांशी भिनलेला असा शब्द विरलत्वानेच सापडतो.

शब्द निर्माण होतात, वापरले जातात, काहींची सद्दी संपते ते कालगत होतात; दुसरे येतात, त्यांची जागा घेतात. हे सारे भाषेच्या प्रकृतीच्या अनुषंगाने होत असते. काही शब्दांच्या बाबतीत असे आढळते की त्यांच्यामागील सामाजिक आशय बोलताबोलता नष्ट होतो. दुसरा त्याची जागा घेतो. समाजसुधारणा हा एका वेळेला लोकप्रिय व समर्पक शब्द, पण जहाल विचारसरणीने त्याला निष्प्रभ केले. साम्यवादी विचाराला महत्त्व आल्यानंतर 'क्रांती' हा शब्द प्रतिष्ठा पावून समाजक्रांती या शब्दाने जहालप्रणीत 'राष्ट्रीय' शब्दाला मागे टाकले. आणि आज सोव्हिएट राज्ये अस्तंगत झाली असता क्रांती हा शब्द आपले प्रभावीपण घालवून बसला. त्याऐवजी 'समाज परिवर्तन' हा आजचा खुणेचा शब्द आहे. रशियात नुकतीच जी उलथापालथ झाली तीत 'ग्लास्नोस्त' व 'पेरेस्त्रोयका' या शब्दांनी भलताच भाव खाल्ला. पण या सर्वांपेक्षा हरिजन शब्दाची कथाच न्यारी आहे.

त्यामुळे महाराष्ट्र राज्याला आपल्या राजपत्राद्वारे त्यांच्या अस्तंगततेला परवानगी द्यावी लागली व त्याचे निर्वाण घडवून आणावे लागले !

हरिजन शब्दाची कथाच न्यारी आहे. अनेकांना महात्मा गांधींच्या वर्तमान (साप्ताहिक) पत्राचे ते नाव होते हे माहिती असेल. वर म्हटल्याप्रमाणे हरिजन हा शब्द दोन सर्वश्रेष्ठ तुल्यबल व 'भारतरत्न' पुरस्कारप्राप्त व्यक्तींशी संबंधित आहे. एकाने त्याला जन्म दिला. तो शब्द दुसऱ्या महापुरुषाला विशिष्ट संदर्भात लागू पडत होता, त्याला तो पसंत नव्हता. त्याने व त्यांच्या अनुयायांनी जन्मभर त्याला हिडीसफिडीसपणे वागवले, आणि शेवटी त्याच्या जन्मताब्दी वर्षात महाराष्ट्र शासनाला त्याचे और्ध्वदेहिक पुरे करावे लागले ! शब्दांचे आयुष्य तसे सांगता येत नाही. पण हरिजन या शब्दाला जेमतेम साठ एकसष्ठ वर्षांचे आयुष्य लाभले. इतका अल्पायुषी असून इतके महत्त्वाचे स्थान प्राप्त झालेला, दुसरा शब्द आढळणार नाही. याचे आगमन ऐतिहासिक महत्त्वाचे व लक्षणीय असे आहे आणि निर्गमन आपण जाणतोच.

ब्रिटिशांच्या राजवटीत १९३१ मध्ये लंडनमध्ये प्रसिद्ध 'गोलमेज परिषद' तत्कालीन ब्रिटिश सरकारने बोलविली. तशा त्यापूर्वी दोन गोलमेज परिषदा झाल्या होत्या. पण त्यात राष्ट्रीय सभेने म्हणजे काँग्रेसने भाग घेतला नव्हता. कारण तो पक्ष असहकारितेच्या धोरणाच्या प्रभावाखाली त्यावेळी होता. तिसऱ्या वेळीही असहकाराचे धोरण तसे चालू होतेच, पण एकंदर परिस्थिती विचारात घेऊन काँग्रेस नेत्यांनी थोडा अपवाद करण्याचे ठरविले. म्हणजे पक्ष म्हणून काँग्रेस त्या परिषदेत सहभागी होणार नव्हती. पण तिच्या वतीने एकटे महात्मा गांधी त्या परिषदेला उपस्थित राहाणार होते. राष्ट्रीय सभेने (नॅशनल काँग्रेसने) तसे ठराव करून निर्णय घेतले. त्याप्रमाणे काँग्रेसच्या वतीने एकटे महात्मा गांधी त्या परिषदेला उपस्थित राहिले.

परिषदेला स्वाभाविकपणे भारतातील सर्व राजकीय पक्षांचे प्रतिनिधी मोठ्या संख्येने उपस्थित होते. डॉ. जयकर, बॅ. सप्रू, डॉ. मुंजे, पंडित मालवीय, सी. वाय. चिंतामणी, श्रीनिवास शास्त्री, न. चिं. केळकर, रामशास्त्री अय्यर, डॉ. आंबेडकर इत्यादी विविध प्रांतातले, विविध पक्षाचे महत्त्वाचे तोलामोलाचे पुढारी तिला उपस्थित होते. काँग्रेसतर्फे एकटे महात्मा गांधी.

ब्रिटिश सरकारने आव तर असा आणला होता की, स्वातंत्र्याच्या दिशेने महत्त्वाची पावले टाकली जाणार. त्यामुळे सारेच पुढारी उत्सुकतेने उपस्थित होते. साहजिकपणे काँग्रेसमधील इतर पुढाऱ्यांनी (काहींची वर्णी लावण्याच्या दृष्टीने) महात्मा गांधींना अशी विनंती केली की, त्यांनी भुलाभाई देसाई, के. एम्. मुनशी यासारखे कायदेतज्ज्ञ काँग्रेसजन तरी न्यावेत. ते म्हणाले ब्रिटिश सरकार फार चाणाक्ष आहे. 'देण्या'चा आव आणून अशा काही त्रुटी मुद्दाम ठेवल्या जातील की त्या आपल्या लक्षात ही येणार नाहीत. तेव्हा त्या दृष्टीने तुम्ही काही साहाय्यक बरोबर घ्या. विशेषतः कायदेतज्ज्ञ.

पण महात्मा गांधींना ते पसंत नव्हते. त्यांनी जो युक्तिवाद केला तो त्यांच्या मोठेपणाचा

द्योतक होता. ते म्हणाले होते की, ब्रिटिश सरकार तसे काही देणारे नाही .... आणि समजा त्याने तसे काही 'देऊ' केलेच तर इतर पक्षांचे मान्यवर कायदेतज्ज्ञ असे जे पुढारी आहेत उदा. सप्रू, जयकर, तात्यासो केळकर इ. ते आपणास मदतच करतील की, त्यांना स्वराज्य हवेच आहे, की त्यांच्या देशभक्तीविषयी कशी आशंका घेता येईल ? अशा रीतीने कोणाचे काही चालले नाही व काँग्रेसतर्फे एकटे गांधीजी उपस्थित राहिले.

ठरल्याप्रमाणे परिषद थाटात पार पडली. तिचे उद्‌घाटन स्वतः पंचमजॉर्ज बादशहांच्या भाषणाने झाले. सर्व पुढाऱ्यांची भाषणे झाली. ब्रिटिश पंतप्रधान (मला वाटते मॅक्डॉनाल्ड) चांगले बोलले. महात्माजी बोलले, ब्रिटिश सरकारने प्रत्यक्षात गांधीजी म्हणाले होते त्याप्रमाणे काहीच भरीवपणे देऊ केले नाही. पण मंत्र्यांनी भाषणे फार चांगली केली. त्यांना उद्देशून गांधीजी आपल्या भाषणात प्रारंभी शेक्सपीअरच्या नाटकातील प्रसिद्ध वचन "वर्ड्ज्, वर्ड्ज् आणि वर्ड्ज्", हे उद्‌धृत केले व त्यावरून आपल्या प्रत्यक्ष पदरात काही पडले नाही, हे सूचित व स्पष्ट केले.

परिषदेत इतरांच्या बरोबरीने डॉ. आंबेडकरांचेही भाषण झाले. ते महत्त्वाचे होते. त्यात त्यांनी स्वराज्याला विरोध केला नाही. परंतु हजार वर्षांवर भारतात अस्पृश्यतेसारखी घृणास्पद प्रथा प्रचलित आहे, त्यामुळे इतिहासकाळात हजारभर वर्षांवर त्या समाजाची जी ससेहोलपट झाली ती सत्ता मिळाल्यानंतर पुनः होणार नाही अशा प्रकारची हमी घेऊन मगच ब्रिटिशांनी पाय काढता घेणे इष्ट ठरणार आहे, ब्रिटिश राज्यकर्त्यांनी तशी हमी घ्यावी कारण त्यांनी आम्हांस पुढे आणले आहे, अशा प्रकारचा युक्तिवाद होता व तो तसा कोणासही अमान्य करणे शक्य नव्हते.

ठरल्याप्रमाणे परिषदेचे सूप वाजले. भारतातील वृत्तपत्रांनी आपापल्या परीने भाष्य केले. पण नुकताच 'संपूर्ण स्वातंत्र्या'चा ठराव केलेल्या काँग्रेस पक्षाची खूपच निराशा झाली. महात्मा गांधी हे तिचे एकटेच पुढारी तेथे गेले होते. अन्य सर्व भारतातच होते. त्यांनी मोठ्या आंदोलनाची हालचाल जोरात सुरू केली.

महात्मा गांधी बोटीने भारतात यात्रयास निघाले. त्यावेळी विमाने नव्हती. ते भारताच्या किनाऱ्यास लागताच त्यांना अटक होणार हे स्पष्ट झाले होते, कारण इतर पुढारी अगोदरच अटकेत गेले होते.

महात्मा गांधी भारतात येण्यापूर्वी व त्यांना अटक होण्यापूर्वी त्यांची मुलाखत घेण्याचे एका पत्रकाराने ठरविले. त्याप्रमाणे बोट किनाऱ्यास लागण्यापूर्वी जो थोडावेळ मिळाला तेवढ्या वेळात त्याने मुलाखत घेतली. त्यावेळी त्याला गांधीजी व्यथित झालेले दिसले. त्यांनी कसले तरी महत्त्वाचे निर्णय घेतले असावेत असे जाणवत होते. कोणते महत्त्वाचे निर्णय घेतले हे पुढे स्पष्ट झाले.

प्रारंभी थोडे औपचारिक बोलणे झाल्यावर त्या पत्रकाराने स्वाभाविकपणे "परिषद कशी झाली ?" असा प्रश्न विचारला. महात्माजींनी त्या संदर्भात स्वतःविषयी बोलताना

"आय् वाज् वेऽड इन द बॅलन्स अँड फाऊंड वाँटिंग" – माझी परीक्षा घेतली गेली व मी तीत नापास झालो, अशा अर्थाचे विधान केले. वस्तुतः त्यांनी परिषदेत केलेल्या आपल्या भाषणात स्वातंत्र्याची मागणी केली होती. पण राज्यकर्त्यांचे काळकाढू धोरण पाहून ते लवकर परतले होते. अधिक स्पष्टीकरण विचारता त्यांनी सांगितले की, परिषदेत सर्व पक्षांच्या पुढाऱ्यांनी आपले म्हणणे युक्तिवादपूर्वक मांडले, त्यांनी युक्तिवाद करतांना जे जे मुद्दे निर्माण केले त्यांचा प्रतिवाद मला करता येत होता. परंतु डॉ. आंबेडकरांनी जो युक्तिवाद मांडला त्याला मजजवळ उत्तर नव्हते. अर्थात ती मुलाखत तशी फार वेळ चालली नाही. गांधीजी आपल्या कृती व निर्णय सांगू शकत नव्हते, कारण ते सारे काँग्रेस पक्षाने ठरवायचे होते.

पण ही घटना भारतीय राजकारणात व व्यक्तिशः महात्माजींच्या जीवनात कलाटणी देणारी अशी ठरली. महात्मा गांधींनी पहिला महत्त्वाचा निर्णय जाहीर केला. तो म्हणजे ते काढीत असलेले "यंग इंडिया" हे साप्ताहिक वृत्तपत्र बंद करणे, त्याऐवजी 'हरिजन' नावाचे वृत्तपत्र–साप्ताहिक सुरू करण्याचे ठरविले. असा 'हरिजन' या शब्द वा संकल्पनेमागला इतिहास आहे. दुसरी गोष्ट गांधीजींनी स्वतः पुढची काही वर्षे क्रियाशील राजकारणापासून निवृत्त व्हायचे जाहीर केले. अहमदाबादचा साबरमतीचा आश्रम त्यांनी बंद केला. ते पुढे वर्ध्यास (महाराष्ट्रात) आले व तेथे त्यांनी आपला आश्रम नव्याने सुरू केला. त्याचप्रमाणे 'हरिजनसेवा संघ,' 'ग्रामोद्योग सेवा संघ' आदी 'विधायक' व खरोखर जनसेवा करणाऱ्या संघटना सुरू केल्या. प्रत्यक्ष कृतिशील 'राजकारण' काय करायचे असेल ते काँग्रेस संघटनेवर सोपविले. आपले लक्ष त्यांनी या नव्या उपक्रमात केंद्रित केले. या संघटना आजही अस्तित्वात आहेत व त्यांचे लोकसेवेचे राजकीय पक्षांशी समांतर कार्य चालू आहे. घेतलेले निर्णय अक्षरशः क्रांतिकारक होते यात तिळमात्र शंका नाही. अस्पृश्यता निवारण्याच्या कार्याला त्यांनी वाहून घेतले. त्यासाठी देशभर प्रवास केला. पाणवठे अस्पृश्यांना (हरिजनांना) मोकळे केले, अनेक रूढींची बंधने थोडी शिथिल झाली. 'गुन्हेगार' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या जमातींचे ते बिरुद नष्ट झाले. सामाजिक दृष्टीने हे सारे खरे तर एक अभूतपूर्व पर्व होते !

हे सारे चालू असता महात्माजींचे राजकीय पुढारीपण चालू होतेच. कारणाकारणांनी त्यांना उपवासांचे निर्णय घ्यावे लागले, तुरुंगवास तर नेहमीचाच होता व त्यातून ह्या संघटना, अस्तित्वात येण्यास हरिजन पत्राचे प्रत्यक्ष प्रकाशन व्हायला तसा थोडा अवधी लागला. हरिजन फेब्रुवारी १९३३ पासून सुरू झाले. खेड्यांकडे अधिक लक्ष देण्याची गरज निर्माण झाली. १९३६ पासून काँग्रेसची अधिवेशने खेड्यात भरू लागली. पहिला मान महाराष्ट्रातल्या खानदेशातील फैजपूर खेड्याने मिळविला. वसतीसाठीही गांधीजी यापुढे हरिजनांच्या, अस्पृश्यांच्या वस्तीत राहू लागले. दिल्लीतले त्यांचे वास्तव्य तर प्रसिद्ध 'भंगी कॉलनी'त असे.





अनुक्रमणिका

योगायोगाने त्यांना महाराष्ट्रातून चांगलाच प्रतिसाद मिळाला. शंकरराव देव, आचार्य स. ज. भागवत, आचार्य विनोबा भावे, आचार्य जावडेकर, आचार्य धर्माधिकारी ही आचार्य मंडळी त्यावेळपासून पुढे आली. त्यांचे कार्य प्रसिद्ध आहे. आचार्य कृपलानी, आचार्य कालेलकर, आचार्य जुगलकिशोर, आचार्य नरेंद्र देव हीही निरनिराळ्या प्रांतांशी संबद्ध अशी 'आचार्य' मंडळी, त्याशिवाय महाराष्ट्रातून सानेगुरुजी, अण्णासाहेब दास्ताने, अण्णासाहेब सहस्रबुद्धे, अण्णासाहेब पटवर्धन, हरिभाऊ फाटक, प्रेमाताई कंटक इत्यादी कितीतरी निष्ठावंत कार्यकर्ते पुढे आले. ही आचार्य परंपरा मला वाटते आपणांप्रत आली आहे.

महाराष्ट्रातून हा प्रतिसाद पाहून गांधीजींना आनंद वाटे, महाराष्ट्राचे ते सार्वजनिक कार्यकर्त्यांचे मोहळ असे वर्णन करीत. महात्मा गांधींच्या हरिजन चळवळीस महाराष्ट्रात व देशात असा वेग येत गेला. त्यातून 'हरिजन' हा शब्द आपल्या समाजजीवनात स्थिरावत गेला.

तसे म्हणायचे झाले तर हरिजनवाचक पर्यायी शब्दांचा विचार केला तर कोणताच पर्याय चपखलपणे निर्विवाद असा नाही. मूळचा शब्द तसा अस्पृश्य. तो बरेचजण वापरीत, पण कित्येकांना तो समर्पक वाटत नसे. प्रा. श्री. म. माटे यांनी त्याच्याबद्दल 'अस्पृष्ट' असा पर्याय रूढ करण्याचा प्रयत्न केला. कित्येक जण 'पूर्वास्पृश्य' असाही पर्याय वापरीत. तसे म्हणायचे झाले तर 'अस्पृश्य' हा व्यापकरीतीने वापरावा असा शब्दप्रयोग नव्हे. कारण सर्व उपेक्षित जातीजमातींपैकी तो काहींनाच लागू पडतो. म्हणजे सर्वव्यापक असा पर्याय नव्हताच वा नाहीच. महात्माजींनी 'हरिजन' हा नवा शब्द तयार करून काही तरी मार्ग काढण्याचा प्रयत्न केला. पण त्यातल्या 'हरि' ने घोटाळा केला –

त्या बाबतीत असे दिसते की, महात्माजींपुढे हा शब्द तयार करताना नरसीमेहता या गुजराती कवीने वैपुल्याने वापरलेला 'वैष्णवजन' शब्द असावा. त्यांचे 'वैष्णव जन तो तेणे कहिये पीड पराई जाने रे।' हे वचन प्रसिद्ध आहे. पण तो तसाच घेण्यात काही अडचणी होत्या. एक तर तो उच्चारावयास कमालीचा अवघड, बोजड. दुसरे म्हणजे काही रूढ संकेताप्रमाणे 'शैव' या जोडीने येणारा. तेव्हा त्यात 'वैष्णव'ऐवजी 'हरि' हा शब्द योजून खरेतर गांधीजींनी चांगला मार्ग काढला होता. पण त्याच्याकडे फारच चिकित्सेने पाहिले गेले, तो फक्त अस्पृश्यांपैकी काही गटांना लावणे जाणे शक्य आहे असा मानला गेला. मुळात महात्माजींना तो तयार करताना 'हरि'ला महत्त्व द्यावयाचे नव्हते, तर 'हरिजन'च्या एकत्रित वापराने जी सत्त्वशीलता सूचित होते तिला महत्त्व द्यायचे होते. पण पुढच्या साऱ्या घटनांमुळे व गदारोळात या बाबीकडे कोणाला लक्षच द्यावेसे वाटले नाही. कारण ज्या जमातींना उद्देशून तो पुढे आला त्या सर्वांना तो मान्य होण्यासारखा नव्हता व नंतर जेव्हा धर्मान्तरितांचा प्रश्न पुढे आला तेव्हा सारे संदर्भच बदलले व तो अधिकच अस्थानी ठरला.

ज्या परिस्थितीतून किंवा मागे आलेल्या घटनाक्रमांतून हा वाद पुढे आला त्यांनीच त्यातून मार्ग काढण्याचा प्रयत्न केला. अंतिमतः तोच स्वीकार्य, एक प्रकारे ते अनिवार्य ठरते.

गोलमेज परिषदेनंतर इंग्रज सरकारने 'जातीय निवाडा' जाहीर केला व मध्यम प्रगती झालेल्या; मागासलेल्या, अतिमागासलेल्या असे सर्व जातींचे वर्गीकरण करून त्या निवाड्यात त्याप्रमाणे निरनिराळया जाती निरनिराळया 'अनुसूची' वा 'कोष्टक' रूपात प्रसिद्ध केल्या. त्यातही काही वर्ग केले, त्यात टोळी स्वरूपात राहणाऱ्या, फिरस्तेपणाने जीवन कंठणाऱ्या, भटक्या . . . इ. प्रकारचे वर्गीकरण करून त्यांना अनुसूचिबद्ध केले. त्यामुळे व्यक्तिगत जाती न उल्लेखिता ज्या कोष्टकाद्वारे त्या सूचिबद्ध त्या कोष्टकाच्या वा अनुसूचीद्वारेच त्या यापुढे ओळखल्या जाणार, असे स्पष्ट दिसते.

पण कागदोपत्री व्यवहाराची व्यवस्था झाली तरी ती तेवढ्यापुरती मर्यादित राहणे पुढे शक्य नव्हते. कारण त्या सवलती मिळाल्याने ते ते वर्ग शिक्षित होऊ लागले व साहजिकपणेच त्यांना आपले या समाजात कोणते स्थान आहे हे जाणवले. त्या दृष्टीने दलित, पतित, उपेक्षित, बहिष्कृत (स्वतः डॉ. आंबेडकरांच्या वृत्तपत्राचे शीर्षक असलेला शब्द) इ. शब्द पर्याय पुढे आले- तसे ते शब्द होते. पण त्यातील, त्यामागील संकल्पना तशा स्वीकार्य नव्हत्या. अद्यापही ठरल्या नाहीत. पण विशेषतः दलित ह्या शब्दाच्या बाबतीत वाङ्मयाच्या व लेखनाच्या निर्मितीने त्याच्या अर्थातील अप्रशस्त आशयाचा भडकपणा कमी झाला व तो शब्द स्वीकार्य ठरला असे दिसते. निदान आज महाराष्ट्र शासनाने मान्य केलेला दिसतो.

शेवटी महाराष्ट्र शासनाला हा अध्यादेश का काढावा लागला हे लक्षात घेणे अवश्य आहे. हरिजन या शब्दाचे जनकत्व या ठिकाणी दाखवून दिल्याप्रमाणे महात्मा गांधींकडे आहे. त्यामुळे काँग्रेसला सरकारी व्यवहार वापरासाठी तो मान्य करण्यात अडचण नव्हती.

दलित शब्द तसा हलके हलके पतिताबरोबर रूढ होत होता. पण त्याच्या अर्थातला सूचित अप्रशस्तपणा काही दिवस प्रभावाने प्रत्ययास येई. वापराने तो कमी झाला. असे शब्दांच्या बाबतीत वारंवार घडते. अलीकडे या वर्गीयांनी वेगळया प्रकारचे व आशयसंपन्न वाङ्मय निर्माण केल्याने त्याला आता एक प्रकारची आशयसंपन्नता आली व आता तो सर्वत्र 'प्रतिष्ठे'ने वापरला जाणार असे दिसते.

असते एकेका शब्दाचे असे भागधेय -

बा 'हरिजन' शब्दा ! तुझी ही जीवितकथा आम्हाला व्यथित करते. महात्मा गांधींसारखा थोर महात्मा तुझा जन्मदाता असला तरी ज्या समाजगटाचा वाचक म्हणून तू अस्तित्वात आलास त्यांनी तुला सदैव दुराव्यानेच वागविले. तुझ्यातील अंतर्भूत सत्त्वशीलता कुणी विचारातच घेतली नाही. तशी महात्मा गांधींमुळे एका वृत्तपत्राच्या शीर्षभागी अधिष्ठित होण्याचा मान तुला मिळाला, आणि त्या बरोबर राजमान्यताही ! त्यामुळे इतके दिवस

तरी निभावून गेले.

बा शब्दा ! नियती खरोखर अजब चीज आहे. ती कोणाची केव्हा कशी फरफट करील व कोणाला डोक्यावर धरील ते सांगता येत नाही. तुझा थोरला भाऊ शोभेल असा तो 'साम्यवाद' शब्द पाहा. केवढी आंतरराष्ट्रीय प्रतिष्ठा आणि मानसन्मान मिळविले बिचाऱ्याने ! नव्या कालाला साजेशा अशा सर्व प्रकारच्या समतेचा, न्यायाचा उद्‌घोष करीत तो आला, गाजला ! पण त्याची आज काय दशा झाली ?. त्याला कुणी वाली आहे का ? त्याचे प्रणेते पण असेच महापुरुष होते, पण ते काही त्याला वाचवू शकले नाहीत.

चालायचेच. महात्मा गांधी व डॉ. बाबासाहेब आंबेडकर या दोन महात्म्यांचा आगळा वेगळा संबंध तुझ्याशी निगडित अशा तुला सदैव धन्य ठरवील !

बा शब्दा ! प्रणाम !

**संकेत, ९३, शिवाजी पार्क, कोल्हापूर.**

---

## राज्याचे व्याकरण आणि व्याकरणाचे राज्य

लुप्ताः केऽपि निजास्पदाद्गुणभृतः केचित्प्रतिष्ठापिताः ।
केऽप्यन्योन्यविभेदतो विरलिताः केचित्तु संश्लेपिताः ।
येनात्यूर्ज्जितशब्दतन्त्रपतिना वर्ण्णा इवोच्चावचां ।
नीता मण्डलितो दशां सुमहतस्मिद्‌धिं पदस्येच्छता ॥

मान्यखेट (मालखेड) इथल्या राष्ट्रकूट घराण्यातील राजा कृष्ण तृतीय (सुमारे ९३९-६७) याच्या कऱ्हाडला मिळालेल्या ताम्रपटामधील श्लोक ३४

(राजाची प्रशस्ती) राजकारण धुरंधर अशा त्याने स्वतःचे उच्च स्थान मिळवण्यासाठी आपल्या काही मांडलिकांची पदे काढून घेतली आणि त्यांच्या जागी अधिक पात्र लोकांची नियुक्ती केली, काहींच्या मध्ये भांडणे लावून त्यांना वेगळे पाडले तर काहींना एकत्र आणले, आणि अशा पद्धतीने सगळ्यांची एक उतरंड रचली – जसा एखादा कुशल शब्दतंत्रज्ञ एखादे लांबलचक शब्दरूप तयार करण्यासाठी काही वर्णांचा त्यांच्या स्थानावरून लोप करील आणि इतर वर्णांना गुणरूपात आणील, काहीमधला भेद लक्षात घेऊन त्यांच्यामध्ये अंतर टाकील तर काहींना जोडून घेईल, आणि अशा पद्धतीने सगळ्यांची एक उतरंड रचील.

संदर्भ : **रामकृष्ण गोपाळ भांडारकर,** कऱ्हाड प्लेट्स ऑव्ह कृष्ण द थर्ड : शकसंवत् ८८०, एपिग्रॅफिया इंडिका ४ : २७८-९०, १८९६-७ (हा ताम्रपट हरी नारायण आपटे यांनी त्यांना उपलब्ध करून दिला.)





अनुक्रमणिका

# भाषांतरातील सममूल्यता आणि जाईची नवलकहाणी

गौरी देशपांडे

भाषांतराच्या अनेक तऱ्हा आहेत. उदा.: शब्दशः भाषांतर, गोळाबेरीज भाषांतर, रूप[illegible], "परकीय कल्पनेवर आधारित", इ. या सर्वांमध्येच "साधर्म्य" किंवा "सममूल्यता" ही एक फार महत्त्वाची संकल्पना आहे. ही काय ते आपण थोडक्यात पाहू.

भाषांतर म्हणजे जर एका भाषेच्या "अर्थ-खुणा समुदायाचे" (Semiotic systems) दुसऱ्या भाषेच्या "अर्थ – खुणा समुदायात" परिवर्तन करणे असे असेल, तर मग साहजिकच प्रश्न उभा राहतो की मूळ भाषेतील "अभाषांतरीय" शब्दा-संदर्भांचे काय करायचे? निरनिराळया प्रकारच्या "अभाषांतीरयत्वा"ची इथे चर्चा न करता असे म्हणता येईल की हे भाषांतर जर नुसतेच भाषिक नसून सांस्कृतिकही असेल तर या मूळ संस्कृतिनिष्ठ संदर्भांचा प्रश्न अधिकच बिकट बनतो. अशा परिस्थितीत कुशल भाषांतरकार सहसा सममूल्यतेचा आधार घेते.

भाषांतर ही मूलतः लक्ष्यवेधी क्रिया आहे. कारण ती सतत आपल्या लक्ष्य-वाचकांकडे डोळा ठेवून असते. त्यामुळे सममूल्यतेचा आधार घेताना भाषांतरकाराला अेक गुंतागुंतीची प्रक्रिया पार पाडावी लागते. मूळ संहितेतील सांस्कृतिक संदर्भांचे अर्थ त्या भाषकांच्या सांस्कृतिक जीवनात काय होते / आहेत यांचा छडा लावून त्यांच्या निकट येणारे लक्ष्य भाषकांच्या सांस्कृतिक जीवनातील संदर्भ शोधून काढून त्यांचा ती लक्ष्य-संहितेत वापर करते. ही प्रक्रिया जर यशस्वी व्हायची असेल तर भाषांतरकाराचे दोन्ही संस्कृती, वाङ्मय, भाषा यांचे ज्ञान सखोल, विस्तृत व बिनचूक असावे लागते हे ओघानेच आले. कधीकधी लक्ष्य-वाचकांच्या ठायी मूळ वाचकांच्या संस्कृतीची थोडीफार माहिती आहे असे गृहीत धरता येते, पण जर लक्ष्य-वाचक लहान मुले असतील, तर भाषांतरकाराला जवळजवळ सर्व काळ सममूल्यतेचाच आधार घ्यावा लागतो. म्हणजेच, मूळ संहितेच्या वाचकांच्या मनात उत्पन्न झालेले विचार/भाव कल्पनेने ताडून तसे भाव आपल्याला लक्ष्य-वाचकांच्या मनात कसे उत्पन्न करता येतील, या प्रश्नाचे तिला उत्तर द्यावे लागते. वरील विवेचनावरून सममूल्यता → समपरिणाम हा प्रवास किती जिकिरीचा आहे ते ध्यानात येईलच. याही पलीकडे जाऊन फक्त यशस्वी अनुवादावर समाधान न मानता अनुवादक जर लक्ष्य-वाचकाच्या मनात मूळ संहितेबद्दल जिज्ञासा निर्माण करू शकली तर दुधात साखर म्हणावी लागेल.

माझ्या लहानपणी मी अनेक इंग्रजी लिखाणांची मराठी भाषांतरे वाचली. त्यात साने गुरुजींच्या मनूबाबा, यती की पती, नदी शेवटी सागरालाच मिळेल इ. पासून ते

शेक्सपिअरच्या नाटकांची विकारविलसित, झुंझारराव, त्राटिका वगैरेही होती. पैकी मनूबाबा वाचून मला मूळ संहितेचा इतका वीट आला की त्यानंतर जॉर्ज एलियटचा सहानुभूतिपूर्वक विचार करणे तीस-चाळीस वर्षे जमले नाही. शेक्सपिअरच्या मराठी भाषांतरांची मजा वाटली आणि त्या भाषांतरकारांनी माझ्या – शेक्सपिअरच्यात निदान अंतराय आणला नाही, हेही नसे थोडके. पण वयाच्या नवव्या दहाव्या वर्षी वाचलेल्या आणि अगदी हरखून जायला लावणाऱ्या, भा. रा. भागवतांच्या, **ॲलिस इन वंडरलँडच्या जाईची नवलकहाणी** या भाषांतराने माझे डोळेच उघडले. एका बाजूने "काय मजा आहे ही !" असे म्हणत असताही मनाचा ठाम निश्चय केला की हे पुस्तक मुळात वाचलेच पाहिजे; आणि ते वाचण्यासाठी मी इंग्रजी शिकायचीही घाई केली. हा त्या अनुवादकाचा असामान्य विजय होता. मराठीत तर त्यांच्या "जाई"ची Vocabulary माझ्या आयुष्याचा एक भाग बनलीच, पण पुढे खुद्द कॅरोलची "Alice" वाचताना मी उलट मागे जाऊन, ती माझ्या "जाई" पेक्षा काही कमी नाही असे ठरवून टाकले.

पुढे स्वतःच भाषांतर/ अनुवाद/ रूपांतर इ. बाबतींत विचार/ कृती करायला लागल्यानंतर समजले की "जाई" तशी मला अगदी "आपली" वाटली याचे महत्त्वाचे कारण म्हणजे या भाषांतराच्या बाबतीत भागवतांनी अनुसरलेले सममूल्यतेचे महत्त्वाचे तत्त्व. ही संकल्पना त्यांनी पूर्ण विचारान्ती स्वीकारली की उत्तम अनुवादकाच्या स्वभावभूत प्रतिभेने आत्मसात केली ते मला ठाऊक नाही, पण त्यांनी ती विलक्षण परिणामकारकरीत्या वापरली हे खरेच.

त्या वापराचे एक उत्कृष्ट उदाहरण म्हणजे सामान्य वाचकांना परिचित असणाऱ्या गाण्या-कवितांचे विडंबन कॅरोल यांनी इंग्रजी भाषिक मुलांना परिचित असणाऱ्या, "फादर विल्यम" अथवा "ट्विंकल" अशा बालगाण्यांचा उपयोग करून "ॲलिस"च्या मनातला गोंधळ तर दाखवलाच पण अतिशय विनोदी अशी विडंबनेही सादर केली. भागवतांनी इथे "म्हातारा इतुका", "रानपाखरास", "बाळा जो जो रे" यांची विडंबने करून कॅरोल यांच्या तोडीस तोड कविता वठवल्या. तसेच आणखी एक उत्तम सममूल्यतेचे उदाहरण म्हणजे "ॲलिस"चा स्पेलिंगचा घोटाळा झाला, तर जाईला ऱ्हस्व-दीर्घ नीट म्हणता येईना. काही काही ठिकाणी "सही सही" भाषांतराच्या मागे लागून भागवतांनी काही खटकणारे शब्द वा वाक्ये टाकली आहेत, पण भाषांतराच्या एकूण गुणवत्तेपुढे ती नगण्य ठरतात.

आता प्रश्न असा : अतिशय मनापासून "जाई"ला दाद देतानाही वाटत राहते की हा अनुवाद सममूल्यतेवर इतका अवलंबून असल्याकारणाने तो कितपत टिकणार आहे ? म्हणजे एकूण ही संकल्पनाच कालबद्ध आहे, आणि तशात ती विडंबनासाठी वापरली गेल्यामुळे ही कालबद्धतेची मर्यादा तिच्यावर अधिक पडते, आणि तिचे आयुष्य अगदीच तुटपुंजे ठरण्याचा संभव निर्माण होतो – फार तर एखाद-दुसरी पिढी म्हणा. खुद्द कॅरोल यांच्या संहितेतलेही काही संदर्भ (उदा. "फादर विल्यम") आता मूळ इंग्रजी भाषक मुलांच्या लेखी कालबाह्य ठरले आहेत. असे पहावे, की ज्यांना रविकिरण मंडळ व माधव ज्युलियन

यांची काहीच माहिती नाही, ते अत्र्यांची विडंबने कितपत चवीने वाचू शकतील ? कॅरोल यांची "ॲलिस" किंवा भागवतांची "जाई" वाचताना होणाऱ्या आनंदात या कालबाह्यतेने घट होते हे खरे आहे, तरी अखेर तो काही पूर्ण लोप पावतो असे नाही हेही खरेच आहे. भागवतांची "रानडुक्करा" वाचून मी आजही खदखदून हसू शकते पण त्या हास्याला अनेक पदर असतात. विशी-तिशीतला माझा सहकारी फक्त "रानडुकरा"वर कुणी कविता करावी या कल्पनेलाच हसू शकतो कारण त्याला मूळ "रानपाखरा" माहीतच नसते आणि हे फक्त एका कवितेचेच विडंबन नाही तर एका कविताप्रकाराचे आहे हे त्याच्या ध्यानात येत नाही.

सममूल्यता जिथे अशा कालसापेक्ष निर्णयांवर अवलंबून नाही तिथेही भागवतांचे भाषांतर किती उत्कृष्ट आहे, ते वाचूनच पाहावे. (त्यांची सममूल्यात्मक विडंबनेही उत्कृष्टच आहेत पण त्यांना कालबाह्यतेचा धोका पोचतो, इतकेच.) उदा.: कडवे/कडवट, इराणी मन्या, "पेरू काढतो आहे", **उकरून**, "तो हात्त आहे शेट," कऱ्हाड/कुऱ्हाड, डुक्कर/शक्कर वगैरे. "शिमग्यातला ससा," "टोपीवाला," "रानउंदीर" आणि "जाई" यांचा प्रसंग तर अप्रतिम आहे. तेथपासून तो पुस्तकाच्या अखेरपर्यंत इतक्या तऱ्हतऱ्हेच्या सममूल्यांचा भागवतांनी धमाल उपयोग केला आहे की वाचकांनी थक्क व्हावे ! आणि आता येथे सममूल्यतेसंबंधीचा दुसरा मुद्दा. कॅरोल यांच्या विडंबनात आलेल्या बहुतेक इंग्रजी कविता-गाण्यांचे इंग्रजी मुले आजही वाचन, पठण, गान करतात कारण ती गाणी त्यांच्या सांस्कृतिक/शैक्षणिक ठेव्याचा एक भाग आहेत. आपल्या मराठी मुलांची इथे सतत पीछेहाट आणि दुर्दशा आहे. इंग्रजी माध्यमातून शिकणाऱ्या मराठी मुलांचे तर सोडाच. (आणि त्यांना आता "शहरी" म्हणण्यातही अर्थ नाही कारण फलटणसारख्या तालुक्याच्या छोट्या गावीही तसल्या शाळा बोकाळू लागल्या आहेत.) पण मराठी माध्यमातून शिकणाऱ्यांची तरी काय गत आहे ? भागवतांनी सममूल्यासाठी वापरलेल्या सर्व गाण्या-कवितांची माझ्या पिढीला पूर्ण ओळख होती. पण माझ्या पुढच्या, मराठी माध्यमातूनच शिकलेल्या पिढीला त्यातली पन्नास टक्केही ठाऊक नाहीत हे सत्य आहे. मग प्रश्न असा : भाषांतरातील "सममूल्यता" या संकल्पनेवर अनुवादकाने कितपत अवलंबून राहावे ?

नुकतीच भागवतांनी त्यांची "जाई" माझ्या (इंग्रजी माध्यमातून शिकलेल्या आणि "ॲलिस" मनापासून आवडणाऱ्या) मुलीला आवर्जून भेट दिली. ती नेट लावून वाचल्यावर तिला जरूर आवडली पण त्यातले अनेक संदर्भ तिच्या आकलनाच्या पलीकडचे होते. वयाच्या ७-८व्या वर्षीच मूळ "ॲलिस" वाचलेल्या त्या मुलीला "जाई" हे एक कुतूहल, नवल होते, पण वयाच्या ७-८व्या वर्षी इंग्रजीचा गंधही नसलेल्या मला ते एक अप्रूप देणे होते ते का आणि कसे, ही गोष्ट मी लेकीला सांगू शकले नाही.

आता शेवटचा महत्त्वाचा मुद्दा : ज्या प्रकारे भागवतांनी सममूल्यांचा आपल्या भाषांतरात वापर केला आहे तो असामान्य आणि फार वाखाणण्याजोगा आहे ही गोष्ट

मला स्वतःला खरे तर मोठेपणी, मी दोन्ही संहितांचा तुलनात्मक आणि "भाषांतर" या प्रक्रियेचा तात्त्विक अभ्यास करायला लागल्यानंतर समजली. लहानपणी, उंदराचे गाणे, बाराखड्या/धड्या, (ग – धडा) शिकवण्याची सुरसुरी असलेली सुसरबाई, शेवंडांचा नाच ("गोफ विणू" या मंगळागौरीच्या नाचावर आधारित) अशा अप्रतिम, कधी कल्पनेतही न आलेल्या गोष्टींवर मी बेहद्द खूष होते. आणि मुख्य म्हणजे पुढे मुळातली "ॲलिस" वाचल्यावर तर भागवतांबद्दलचा नितांत आदर व कृतज्ञता कमी न होता उलट वाढलीच.

पण अखेर भाषांतरातल्या सममूल्याच्या संकल्पनेबद्दलचा विचार वर उरतोच. म्हणूनच तर शेक्सपिअरची दर पिढीत नवी भाषांतरे होतात. तरी आपल्या "ॲलिस"चे भागवतां-अगोदर वा नंतरही कुणी इतके समर्पक भाषांतर केलेले नाही हे ध्यानात घ्यावे. याचेही कारण: त्यासाठी लागणारी सममूल्यतेची चौफेर जाणीव आणि ती प्रत्यक्षात उतरवण्यासाठी लागणारे मराठी साहित्याचे प्रेम आणि ज्ञान आता कुणात उरले नाही, हे तर नसेल ?

या शंकेने व्याकुळ होताहोताच "दादां"चे, या माझ्या बालपणच्या आनंददात्याचे, माझ्या प्रकाशकांपैकी पहिल्या दुसऱ्याचे आणि भाषांतरातल्या एका गुरूचे रीण मानून टाकते !

इंग्रजी विभाग,
पुणे विद्यापीठ, पुणे ४११ ००७

---

## संस्कृतमधल्या चुका प्राकृतमधले खिळे

भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिराच्या मुद्रणालयात संस्कृत आणि प्राकृत बृहत् कोशांच्या मुद्रणाचे काम चालते. दसऱ्याच्या दिवशी मुद्रणालयाच्या पूजेसाठी ग्रंथालयातल्या अभ्यासकांना निमंत्रण होते. संस्कृत–कोश–मुद्रणाच्या विभागाची पूजा संपली. प्रसाद वाटला. संचालक म्हणाले, "आता प्राकृत कोशाच्या मुद्रणविभागाच्या पूजेला जाऊ." एकांनी विचारले, "संस्कृत आणि प्राकृत दोन्ही देवनागरीच. मग वेगवेगळे मुद्रणविभाग कशासाठी ?" संचालक काही बोलणार एवढ्यात टिळक महाराष्ट्र विद्यापीठाचे प्राचार्य डॉ. श्रीकान्त बहुलकर म्हणाले, "सरळ आहे. संस्कृतमधल्या चुकांचे प्राकृतमध्ये खिळे होतात !" संस्कृत शब्दांचे प्राकृतमध्ये रूपांतर कसे होत असते हे जाणणाऱ्या मंडळींनी या कोटिक्रमाला खळखळून दाद दिली.

# ओ के (OK) ची कूळकथा

पु. कृ. गर्दे

मराठी कोशवाङ्मयात व्युत्पत्तिकोशासारख्या मौलिक ग्रंथाची भर घातल्याबद्दल कृ. पां. कुलकर्णी यांचं अभिनंदन करण्यासाठी त्यांना लिहिलेल्या पत्रात तात्यासाहेब केळकरांनी म्हटलं होतं : "शब्द उच्चारणे आणि त्याचा व्यवहार करणे हे काम कोणतीही भाषा बोलणारा मनुष्य त्याविषयी इतर काही ज्ञान नसतानाही करतच असतो. परंतु दहा-वीस हजारात तरी एखाद्याला सहज अशी जिज्ञासा क्वचित उत्पन्न होते की बोलतो, ऐकतो, समजतो त्या शब्दाची उत्पत्ती व कुळकथा तरी काय आहे ? . . . शब्दाच्या केवळ मूळ उत्पत्तीच्या ज्ञानापेक्षाही त्या शब्दाची कुळकथा अधिक मनोरंजक व ज्ञानप्रद ठरते . . . एकच शब्द किंचित वेषांतराने, रूपांतराने, जगातील अनेक देशांत, समाजांत वावरतो व अभिमानास्पद होतो हे पाहिले म्हणजे एकंदर मानवी कुटुंबाविषयी आपलेपणाची भावना निर्माण झाल्याशिवाय कशी राहील ?" [१] तात्यासाहेबांनी म्हटलेल्या वेषांतरित किंवा रूपांतरित नव्हे, तर आपल्या अस्सल मूळ स्वरूपात जो एक शब्द जगातल्या जवळजवळ प्रत्येक भाषेत जणू तो स्वभाषेतला असल्याइतक्या सहजतेनं आज वापरला जात आहे त्या शब्दाची ही कुळकथा आहे. तो शब्द म्हणजे अमेरिकन– इंग्रजी भाषेतला ओके (OK).

ओके हा शब्द अनन्यसाधारण म्हटला पाहिजे. कारण वास्तवात तो एक शब्द नसून दोन शब्दांच्या आद्याक्षरांचा "एक" मानला गेलेला शब्दप्रयोग आहे. तो बहुतांशी बोली भाषेत वापरला जातो, आणि तत्कालिक संदर्भानुसार त्याच्या अर्थाला वेगवेगळया छटा लाभतात. उदा. –

१) उद्या सकाळी आठ वाजता भेटायचं, OK? (ठरलं तर?)

२) गेल्या आठवड्यात त्याला बरं नव्हतं, but he is OK now (तो आता ठीक आहे) .

३) It's OK with me (माझी त्याला संमती आहे)

लिखित भाषेत ओकेचा यापैकी जो उपयोग आता रूढ झाला आहे तो त्याच्या संमतिदर्शक अर्थासाठी. त्याकरता मूळच्या OK या अद्याक्षरांचं Okay असं एकत्रीकरण करून ते क्रियापद म्हणून वापरलं जातं. उदा. Israel okays self-rule in Gaza (गाझाला स्वायत्तता देण्यास इस्रायलची मान्यता).

ओके या आद्याक्षरांनी कोणते दोन शब्द संक्षिप्त केले आहेत, हा शब्दप्रयोग प्रथम

केव्हा आणि कुणी वापरला, कालौघात त्याच्या अर्थात काही बदल होत गेला का याचा शोध घेण्यासाठी एका शतकाहून अधिक काळ अमेरिकन भाषाशास्त्रज्ञांनी संशोधन केलं आहे. अमेरिकन-इंग्रजी भाषेवरच्या आपल्या विपुल लिखाणामुळे त्या भाषेचा एक अग्रगण्य मानला गेलेला भाष्यकार मेन्केन (H. L. Mencken) यानं न्यू यॉर्कर (The New Yorker) या साप्ताहिकात १९४९ साली "The Life and Times of OK" या शीर्षकाखाली एक विस्तृत लेख लिहून या संशोधनाचा आढावाही घेतला होता. त्यात ज्याच्या संशोधनाची मेन्केननं प्रशंसा केली होती, आणि त्यानंतर केलेल्या संशोधनामुळे ज्याचं नाव ओकेच्या व्युत्पत्तीच्या शोधाशी अतूटपणे जोडलं गेलं, ते ॲलन वॉकर रीड (Allen Walker Read) यांचं.

ओकेच्या व्युत्पत्तीशी रीडचा संबंध आला तो काहीसा योगायोगानंच. ऑक्सफर्ड इंग्लिश डिक्शनरी (OED) च्या धर्तीवर अमेरिकन-इंग्रजीचा डिक्शनरी ऑफ अमेरिकन इंग्लिश (DAE) हा शब्दकोश तयार होत असताना संपादक मंडळातल्या त्याच्या काही स्नेह्यांनी रीडचं साहाय्य मागितलं. त्यावेळी DAE साठी "O" या अक्षरानं सुरू होणाऱ्या शब्दांचं संकलन चालू होतं. रीडनं "OK" या नोंदीचा मसुदा पाहिला, आणि त्यात ओकेचा सर्वप्रथम वापर दाखवण्यासाठी जे अवतरण उद्धृत केलं होतं त्याच्या पूर्वीही त्या शब्दाचा वापर झाला असला पाहिजे अशी बळकट शंका आल्यामुळे त्यानं त्याचा अधिक शोध घेण्याचं ठरवलं.

ओकेच्या व्युत्पत्तीचा मागोवा घेण्याची सुरुवात भाषाशास्त्रज्ञांनी करण्यापूर्वीही OK म्हणजे Orful Kurious, Oll Kounted, Oll Krazy असे काडीचाही आधार नसलेले तर्क वेळोवेळी केले गेले होते. प्रणयाराधनाची मजल कुठे पोचली आहे ते सांकेतिक भाषेत सांगण्यासाठी अमेरिकन युवक-युवती (OK = Only Kissing) म्हणत असत असंही एक स्पष्टीकरण काही काळ प्रचलित होतं. हे सगळे तर्क उघड उघड थिल्लर स्वरूपाचे होते. पण ज्याची गंभीर दखल १८५९ पासून सुमारे एक शतकभर अमेरिकन-इंग्रजीच्या इतिहासात घेतली गेली ते स्पष्टीकरण १८२९-४७ या काळात अमेरिकेचा राष्ट्राध्यक्ष असलेल्या ॲण्ड्र्यू जॅक्सन (Andrew Jackson) याच्याशी निगडित आहे. ते स्पष्टीकरण असं की जॅक्सन आपली मान्यता दाखवण्यासाठी सरकारी कागदपत्रांवर Oll Korrect असं लिहून स्वाक्षरी करत असे. पुढे पुढे हे शब्द त्यांच्या संपूर्ण स्वरूपात लिहिण्याऐवजी त्यानं ते OK या त्यांच्या अद्याक्षरांनी लिहिण्यास सुरुवात केली, आणि या काटकसरीतून ओकेचा उगम झाला. जॅक्सनशी निगडित असलेली, परंतु भाषाशास्त्रज्ञांना अधिक ग्राह्य वाटलेली, ओकेची एक वेगळी व्युत्पत्ति अलाबामा विद्यापीठातल्या वायमन (W. S. Wyman) या प्राध्यापकानं १८८५ साली सादर केली होती. त्याच्या संशोधनानुसार ओकेचा उगम अलाबामा-मिसिसीपी या प्रदेशातल्या एका आदिवासी जमातीच्या भाषेत आहे. त्या भाषेत ठासून होकार देण्यासाठी Okeh किंवा

Oke अशा उच्चाराचा शब्द आहे. त्या बाजूच्या प्रदेशात केलेल्या प्रवासात जॅक्सनला तो शब्द विशेष भावला असावा, आणि म्हणून त्यानं OK या स्वरूपात आपल्या कारभारात त्याचा वापर सुरू केला. वायमनच्या या व्युत्पत्तीची दखल बऱ्याच शब्दकोशांनी घेतलेली आढळते.

आपलं स्वतःचं ओकेच्या व्युत्पत्तीचं संशोधन सुरू करताना रीडनं त्याची दिशा पक्की केली होती. आपल्या निष्कर्षाला निर्णायक म्हणून मान्यता मिळवायची असेल तर ओके ज्या अर्थानं आज वापरला जातो त्याच अर्थानं लिखित भाषेत त्याचा सर्वप्रथम वापर केव्हा झाला याचा सज्जड पुरावा सादर केला पाहिजे अशी खूणगाठ त्यानं आपल्या मनाशी बांधली होती. ओकेचा वापर १८४० च्या सुमारास सुरू झाला असावा हे सर्वसंमत अनुमान ग्राह्य त्यानं त्या काळच्या समग्र साहित्याची छाननी करण्याचा बेत आखला. वृत्तपत्रं ही साहित्य म्हणून मानली जात नसली तरी भाषेच्या जडणघडणीत वृत्तपत्रांचा फार मोठा आणि महत्त्वपूर्ण भाग असतो हे त्याला इतर कोणी सांगण्याची गरज नव्हती. म्हणून ओकेचा काहीतरी थांगदोरा वृत्तपत्रांत निश्चित सापडेल अशा विश्वासानं प्रथम त्यानं न्यूयॉर्क हिस्टॉरिकल सोसायटीच्या ग्रंथालयातले अमेरिकन वृत्तपत्रांचे १८४० सालचे अंक चाळण्यास सुरुवात केली. त्याचा विश्वास अनाठायी ठरला नाही. अमेरिकन राष्ट्राध्यक्षपदासाठी १८४० साली जी निवडणूक होणार होती त्या निवडणुकीबद्दलच्या बातम्यांनीच सारी वृत्तपत्रं भरगच्च भरलेली होती. त्या निवडणुकीत त्यावेळी अमेरिकेचा राष्ट्राध्यक्ष असलेला मार्टिन व्हॅन ब्यूरेन (Martin Van Buren) हा पुन्हा राष्ट्राध्यक्षपदासाठी उमेदवार म्हणून उभा होता. व्हॅन ब्यूरेन हा न्यूयॉर्क राज्यातल्या किंडरहुक (Kinderhook) या गावचा रहिवासी होता म्हणून (कोणी कितीही मोठ्या पदावर असला तरी त्याच्याशी सलगी दाखविण्यासाठी त्याला एखादं टोपण नाव बहाल करण्याच्या अमेरिकन हव्यासानुसार) निवडणुकीच्या प्रचारात न्यूयॉर्कची वृत्तपत्रं "ओल्ड किंडरहुक" (Old Kinderhook) असा त्याचा उल्लेख करू लागली होती. ते नाव जनमानसात पुरेसं रुळलं आहे अशी खात्री पटल्यावर वृत्तपत्रांनी त्या नावाचा "O.K." असा संक्षेप केला होता.

न्यूयॉर्कमध्ये प्रसिद्ध होणाऱ्या न्यू ईरा (New Era) या वृत्तपत्राच्या २३ मार्च १८४० च्या अंकात व्हॅन ब्यूरेनला पाठिंबा देणाऱ्या "डेमोक्रेटिक ओ. के. क्लब" (Democratic O.K. Club) या संस्थेचा उल्लेख होता. ओकेच्या लिखित उपयोगाचा हा पुरावा रीडला मिळाला होता. इतकंच नव्हे तर तो ठोस ऐतिहासिक संदर्भासह मिळाला होता.

ओकेचा उगम ओल्ड किंडरहुक या नावाच्या आद्याक्षरांपासून झाला आहे हे स्पष्ट झालं होतं तरी त्याला आज असलेल्या अर्थांपैकी कोणताच अर्थ त्यातून प्रतीत होत नव्हता. तो अर्थ त्याला केव्हा प्राप्त झाला ते शोधण्यासाठीही रीडला फारशी यातायात करावी लागली नाही. न्यू ईराच्याच २७ एप्रिल १८४० च्या अंकात व्हरमाँट (Vermont)

च्या एका नागरिकानं लिहिलेल्या पत्रात "Will you not say O.K.? Go ahead," असा ओकेचा संमतिदर्शक अर्थ व्यक्त करणारा मजकूर रीडला आढळला आणि त्याचं उरलेलं संशोधनही पूर्ण झालं. ते पत्र व्हरमाँटच्या नागरिकानं लिहिलं होतं ही गोष्ट रीडच्या दृष्टीनं विशेष सूचक होती. न्यूयॉर्क खेरीज इतर राज्यांतही ओके हा शब्द वापरला जाऊ लागला आहे याचं ते प्रत्यंतर होतं. राष्ट्राध्यक्ष निवडणुकीच्या प्रचाराला जसजसा वेग येऊ लागला तसतसा तो शब्द देशभर पसरून अमेरिकन भाषेत समाविष्टही होऊन गेल्याचं रीडला आवडलं. एवढा पुरावा हाती आल्यावर रीडनं आपला निष्कर्ष सॅटरडे रिव्ह्यू ऑफ लिटरेचरच्या (Saturday Review of Literature) १९ जुलै १९४१ च्या अंकात प्रसिद्ध केला. बहुतेक सर्व अमेरिकन भाषाशास्त्रज्ञांनी ही व्युत्पत्ति मान्य केली. रीडचं अभिनंदन करताना मेन्केननं त्याला लिहिलं : "मला वाटतं की ओकेच्या व्युत्पत्तीचा प्रश्न आता ठामपणे आणि कायमचा सुटला आहे."

रीडचा निष्कर्ष भाषाशास्त्रज्ञांनी मान्य केला तरी ओकेचा मागोवा ते घेतच राहिले. मात्र त्याच्या उपपत्तीला आव्हान देणारा पहिला पुरावा दहा वर्षांनंतर ज्याला मिळाला तो रॉबर्ट ग्रे गंडरसन (Robert Gray Gunderson) भाषाशास्त्रज्ञ नसून एक इतिहास संशोधक होता. राष्ट्राध्यक्षपदाच्या १८४० च्या निवडणुकीवरचा आपला प्रबंध तयार करत असताना गंडरसनला ओकेचा उपयोग केलेला जो एक उतारा मिळाला तो रीडनं दाखला म्हणून सादर केलेल्या न्यू ईराच्या २३ मार्च १८४० च्या अंकापेक्षा सुमारे एक महिना पूर्वीचा होता, आणि रीडच्या निष्कर्षाला त्याहीपेक्षा अधिक हानिकारक म्हणजे त्यात ओकेचा वापर ओल्ड किंडरहुक या नावाची आद्याक्षरं म्हणून केलेला नव्हता, तर Oll Korrect या जॅक्सनशी निगडित असलेल्या शब्दांची अद्याक्षरं म्हणून केलेला होता.

त्यानंतर पुन्हा दहा वर्षांनी रीडच्या उपपत्तीचं खंडन करणारा जो दुसरा पुरावा मिळाला तो DAE साठी ओकेची नोंद तयार करणाऱ्या वुडफर्ड हेफ्लिन (Woodford Heflin) या भाषाशास्त्रज्ञाला. हेफ्लिनला ओकेचा जो संदर्भ मिळाला तो रीड आणि गंडरसन या दोघांनाही मिळालेल्या संदर्भापेक्षा अधिक पूर्वीचा, म्हणजे १२ नोव्हेंबर १८३९ चा होता, आणि त्यातही ओल्ड किंडरहुकचा उल्लेख नव्हता.

आपल्या संशोधनाचं हे खंडन अर्थातच रीडला स्वस्थ बसू देणार नव्हतं. ओकेच्या व्युत्पत्तीचा पाठपुरावा करण्यासाठी त्यानं यावेळी १८४० च्या पूर्वीच्या वृत्तपत्रांची छाननी सुरू केली. आणि त्याचं नशीब असं बलवत्तर की या खेपेसही त्याला फारसे सायास न करता ओकेचा उगम सापडला. त्याचं असं झालं की बॉस्टनच्या मॉर्निंग पोस्ट (Morning Post) या वृत्तपत्राच्या संपादकाला त्या वृत्तपत्राची एक विरक्त, गंभीर वृत्तपत्र अशी जी प्रतिमा होती ती निपटून टाकून तिच्या जागी एक खेळकर, हलकंफुलकं वृत्तपत्र अशी नवी प्रतिमा निर्माण करायची लहर आली, आणि त्याचा एक मार्ग म्हणून त्यानं १८३८ सालापासून मॉर्निंग पोस्टच्या रकान्यांत ठिकठिकाणी संपूर्ण शब्दांऐवजी त्यांची आद्याक्षरं

देऊन मजकूर छापण्याची एक विक्षिप्त टूम सुरू केली होती. मॉर्निंग पोस्टमधल्या मजकुराचं आकलन त्यातल्या आद्याक्षरांचं कोडं सोडवल्याखेरीज होणं किती अशक्यप्राय होतं ते प्रत्यक्ष त्यातला एक उतारा देऊनच स्पष्ट करावं लागेल :

"We understand that J. Elliot Brown F. A. H. N. J. (fell at Hoboken, New Jersey) in a duel W.O.O.O.F.C. (with one of our first citizens).

वाटेल त्या शब्दांचा त्यांच्या आद्याक्षरांत नुसता संक्षेप करून वाचकांना बुचकळयात टाकण्याचं समाधान मॉर्निंग पोस्टला पुरेसं वाटलं नसावं. कारण त्याच्याही पुढे जाऊन शब्दांची चुकीची, पण समोच्चारित, स्पेलिंग वापरून त्यांच्या आद्याक्षरांचा उपयोग केला जाऊ लागला. उदा. "No Go" याचं स्पेलिंग "Know Go" असं करून त्यासाठी "K.G." किंवा "No Use" याचं स्पेलिंग "Know Yuse" असं करून त्यासाठी "K. Y." ही आद्याक्षरं मॉर्निंग पोस्टनं वापरलेली आहेत. या विक्षिप्तपणातच रीडला "All Correct" या शब्दाचं "Oll Korrect" असं स्पेलिंग करून त्याचा "OK" असा संक्षेप केलेला उतारा २३ मार्च १८३८ च्या मॉर्निंग पोस्टमध्ये मिळाला. अॅण्ड्र्यू जॅक्सनशी निगडित असलेली व्युत्पत्तीच शेवटी निर्णायक ठरली, पण त्यासाठी सरकारी कागदपत्रांत नव्हे, तर समाजात ओकेचा प्रचलित अर्थाशी जुळणारा सर्वप्रथम वापर केव्हा झाला त्याचं संशोधन करावं लागलं.

अमेरिकन स्पीच (American Speech) या नियतकालिकात १९६३साली सहा लेख लिहून रीडनं ओकेच्या कुळकथेच्या संशोधनाची साद्यंत माहिती दिली आहे. आणि तेव्हापासून आजतागायत २३ मार्च १८३८ पूर्वी ओकेचा वापर झाल्याचा पुरावा कोणी सादर केला नसल्यामुळे रीडचं नाव त्याच्या व्युत्पत्तीशी अतूट जोडलं गेलं आहे.

**संदर्भ :** (१) ह. वि. मोटे, संपादक. विश्रब्ध शारदा, खंड पहिला, १८१७-१९४७. (मुंबई, ह. वि. मोटे प्रकाशन, १९७२) पृ-. ५४९-५०.

* The New Yorker च्या ४ सप्टेंबर १९८९ च्या अंकामधल्या "At Play in the Language" या लेखावर आधारित.

**२२९१ अ, मोदीबाग, पुणे ४११ ०१६.**





अनुक्रमणिका

# म्हणजे शब्द आपणहून येतील

**नीती बडवे**

*("शब्दांच्या पलीकडले" ही एक १३ मुलाखतींची मालिका आहे. जर्मनीतील सांस्कृतिक आणि सार्वजनिक क्षेत्रातील मान्यवर अशा व्यक्तींनी 'जर्मन भाषा' या विषयावर आपले विचार या मालिकेत प्रकट केले आहेत. त्यातील हा पहिला वेचा गोलो मान यांचा आहे.*

*गोलो मान हे इतिहासतज्ज्ञ आणि लेखक आहेत. १९५८ मध्ये त्यांचा 'एकोणीस आणि विसाव्या शतकाचा जर्मन इतिहास' हा ग्रंथ व १९७१ मध्ये* 'Biography of Commander Albrecht von Wallenstein' *हे चरित्र प्रसिद्ध झालं. त्यांच्या बहुविध लिखाणात या दोन साहित्यकृती विशेष उल्लेखनीय आहेत. हे ग्रंथ फार विद्वत्तापूर्ण लिहिलेले आहेत. तरीही ते वाचकांच्या सर्व स्तरांपर्यंत पोचतात. त्यातली साधी, पण सुस्पष्ट आणि जोमदार भाषा फार परिणामकारक आहे. इतिहासातली सांगायला कठीण भासणारी गुंतागुंत यात सुलभरीतीनं मांडली आहे. अनाकलनीय गोष्टी सहज समजतील अशारीतीनं सांगितल्या आहेत.*

*लेखकाला फ्रेंच आणि इंग्रजी भाषाही उत्तम अवगत आहेत. आपले वडील थोमास मान यांच्यासह गोलो मानना २४ वर्षांचे असतांनाच म्हणजे १९३३ साली स्वदेश सोडावा लागला. पुढचं शिक्षण त्यांनी तीन भाषांत घेतलं. त्या तीन भाषा रोजच्या जीवनात वापरल्या आणि शिकवल्याही. त्यांच्या जर्मनवर "गोलो मान"ची म्हणून वेगळी छाप आहे.)*

## शब्दातीत असं काही

**– गोलो मान्**

फ्रिडरिश र्‍यूकर्टच्या (Friedrich Rückert) छान चार ओळी आहेत, त्या अशा :
आणखी एक भाषा
जी तू शिकतोस, त्याद्वारे मुक्त करतोस तू
आतापर्यंत तुझ्यात बंदिस्त
अशा एका नव्या शक्तीला,





अनुक्रमणिका

परभाषा येत असणं, हे नक्कीच स्वागतार्ह आहे. त्यामुळे आपली स्वतःची भाषा बिघडत तर नाहीच, उलट ती अधिक समृद्ध होते. उदाहरणार्थ, मला वाटतं, माझ्या फ्रान्स आणि अमेरिकेतल्या दीर्घ वास्तव्यातच मी अधिक कसदार जर्मन लिहायला शिकलो. तरीही स्वभाषा आणि परभाषा यात खूपच मोठा फरक आहे. मातृभाषेनं आपल्या व्यक्तित्वाचा फारच मोठा भाग व्यापलेला असतो. आपण जसे आज आहोत, तसे तिच्याखेरीज नक्कीच झालो नसतो. परदेशी माणसाबरोबर परदेशी भाषा बोलतांना कधीच पूर्ण समाधान होत नाही. कधी असंही होतं, की बोलत असलेली भाषा बोलणाऱ्या दोघांनाही परभाषा असते. उदा. एखादा जर्मन माणूस इटालियन माणसाबरोबर इंग्रजी बोलतो, तेव्हा असं वाटतं की जसा काही एखादा अपारदर्शक पडदा त्या दोन व्यक्तींना एकमेकांपासून अलग करतोय.

मातृभाषेच्या अनन्यसाधारण स्थानाविषयी सांगायचं, तर माझ्या अनुभवावरून एक उदाहरण देता येईल. चांगल्या इंग्रजी किंवा फ्रेंच गद्याचा आस्वाद घेऊन मी आनंद मिळवू शकतो. पण कवितांची गोष्ट वेगळी आहे. परभाषेतल्या कविता कितीही आवडल्या, तरी त्या मी लक्षात ठेवू शकत नाही. त्यांचं सारखं विस्मरण होतं. याउलट पुष्कळ जर्मन कविता मला तोंडपाठ येतात. अंथरूणावर पडताना त्या माझ्या सोबतीला असतात आणि त्यांच्या संगतीतच मला झोप लागते. हा फरक कसा पडतो ? कारण गद्याच्या तुलनेनं कविता ही अधिक जवळीक साधते, आंतरिक नातं जोडते. म्हणजे ती खूपशी प्रार्थनेसारखी असते. अशा वेळी मातृभाषेची अतुलनीय शक्ती जाणवते.

आमची जर्मन भाषा ही इतर कोणत्याही सुसंस्कृत भाषेसारखीच सुंदर आहे. अधिक समृद्धही नाही किंवा अधिक अविकसितही नाही. ती 'आमची स्वतःची' आहे, म्हणून ती आम्हांला प्रिय आहे. अभिव्यक्तीसाठी, वास्तवतेच्या वर्णनासाठी, एकमेकांना समजण्यासाठी लागणाऱ्या क्षमतेचा ती मूलस्रोत आहे. याचा राष्ट्रवादाशी काहीही संबंध नाही. उलट राष्ट्रवादी जर्मन लोक अतिशय तिरस्करणीय असं जर्मन बोलत आणि लिहीत असत. बिस्मार्क मात्र त्यात मोडत नाही. त्याचं जर्मन फार दर्जेदार होतं. पण तो त्या अर्थानं राष्ट्रवादीही नव्हता. अगदी ग्योट (Goethe), हायनं (Heine) किंवा शोपनहाऊअर (Schopenhauer) यांची आणि इतर मान्यवर जर्मन भाषापंडितांची होती, तशीच, बिस्मार्कचीही इतर भाषांशी आंतरिक जवळीक होती.

सर्वसामान्य लेखी भाषा आणि एखादी बोली यांच्यात एक प्रकारचं सृजनशील संघर्षाचं नातं असतं. बोली ही अधिक सहजसुलभ नैसर्गिक असते. आपल्या प्रांतातल्या लोकांशी संभाषण करतांना आपली बोली ही आपल्या व्यक्तित्वाचा एक भाग म्हणून विशेष प्रतीत होते. खरं म्हणजे मला माझी अशी बोली नाही याचं नेहमीच वाईट वाटत आलं आहे. एक तर मी एका प्रगल्भ साहित्यिक कुटुंबात जन्माला आलो आणि वाढलो, आणि दुसरं म्हणजे आमचं मूळ उत्तरेकडचं कुटुंब दक्षिणेच्या बाजूला बव्हेरियात येऊन राहिलं, त्याचा हा परिणाम. स्विट्झर्लंड हा माझ्या दीर्घ परिचयाचा आणि आवडता देश.

त्या देशाचं एक वैशिष्ट्य आहे. इथली जर्मन बोली हीच जवळपास एक स्वतंत्र भाषा झाली आहे आणि अगदी उच्चभ्रू लोकसुद्धा आपापसात बोलतांना हीच बोलीभाषा वापरतात. तिच्या खेरीज किंवा तिला वरचढ असा एक भाषाप्रकार आहे. ज्याला स्विस लोक "लेखीबरहुकूम" जर्मन असं म्हणतात. आणि तरीही – किंवा कदाचित त्यामुळेच स्विस लोक उत्तम जर्मन लिहितात. माझ्या मते त्यांच्या वृत्तपत्रांची भाषा जर्मन वृत्तपत्रांच्या भाषेहून सरस असते.

आता पाहा, मी व्यवसायानं लेखक माणूस. भाषेसंबंधी जागरूक आणि कृतिशील असणं, भाषेची अधोगती तर होत नाही ना, दर्जा खालावत नाही ना, यावर योग्य रीतीनं आणि विनयपूर्वक नजर ठेवणं, हे तर लेखकाचं कामच आहे. फ्रान्समध्ये ते अतिशय विचारपूर्वक आणि अधिकृतपणे केलं जातं. फ्रेंच भाषेत फक्त अत्यावश्यक तिथेच बदल आणि परिवर्तन घडेल, फ्रेंच भाषा शुद्ध राहील, विशेषतः परकीय शब्द तिच्यात घुसणार नाहीत, याची खबरदारी पॅरिसची ॲकॅडेमी ऑफ रायटर्स आणि सरकारी कार्यालयं संयुक्तरीतीनं प्रयत्न करून घेतात. माझ्या तरी माहितीनुसार आमच्याकडे अशी काही व्यवस्था नाही.

आम्ही जर्मन लोकांनी फारच हौसेनं नेहमी जर्मन शब्द उचलले आहेत, प्राचीन काळी लॅटीनमधून, नंतर फ्रेंचमधून आणि हल्ली अमेरिकन इंग्लिशमधून. मधे मधे काही वेळा असं घडलं, की लोकांनी चिडून परकीय भाषेतील शब्दांचा पिच्छा पुरवला आणि त्यांच्या जागी नवीन मुद्दाम तयार केलेले शब्द आणले. उदा. "ग्रेव्ही"साठी "टुंक" आणि "मायोनज"साठी "आंबट बायगूस" हा तर अर्थात वेडेपणाच होता. या मार्गानं काहीच साध्य होणार नाही.

भाषा सजीव आहे. तिचं संग्रहालय होऊ नये. नवीन गोष्टींसाठी नवीन शब्द लागतात. जुन्या शब्दांना अर्थ देणं जमतंच असं नाही, आणि त्यात आक्षेपार्ह असं काहीच नाही. अगदी फॅशनेबल चालू वापरातल्या शब्दांबद्दलही नाही. कधी कधी ते एखादा मूड किंवा परिस्थिती व्यक्त करतात, किंवा काही अमेरिकन शब्द 'ओके', 'क्लेव्हर' (= स्मार्ट) असे शब्द. रोजच्या घरगुती वापरात ते गंमतशीर वाटतात. पण एखाद्या औपचारिक, लेखी समालोचनामध्ये मी असे शब्द वापरणार नाही. मला सर्वसाधारणपणे असं वाटतं, की जरा शोधलं तर सापडेल, असा एखादा चपखल शब्द मातृभाषेत असताना, तिथे जर आपण परभाषेतल्या शब्दाच्या आहारी गेलो, त्याच्यापुढे सपशेल शरणागती स्वीकारली, तर ते काही रुचण्यासारखं नसतं. माझ्या मते जर्मनीत आज अशा ठिकाणी जरुरीपेक्षा जास्तीच "पापकर्म" केली जातात.

यावर सगळयात चांगला उपाय म्हणजे होऊन गेलेल्या मातब्बर लेखक आणि कवींचं साहित्य वाचणं. १९ व्या, १८ व्या किंवा अगदी १७ व्या शतकातलंसुद्धा आणि हे शाळाशाळांमधून प्रत्यक्ष राबवलं जाईल, निदान मागच्या २० वर्षांपेक्षा तरी आता या

साहित्याची जास्त दखल घेतली जाईल, अशी आशा करू या. कारण पूर्वीच्या या श्रेष्ठींची भाषा आजच्या भाषेच्या तुलनेत समृद्ध आणि सक्षम होती. एखाद्या भाषेचं विकसन होत असतांना ती काही फक्त काहीतरी नवं आपल्यात सामावून घेते किंवा नवं घडवते असं नाही, तर जुन्याचं पुनरुज्जीवनही करीत असते. लेखक या भूमिकेतून मी पुष्कळदा असा प्रयत्न केला आहे. कधी कधी तर माझ्या गद्यामध्ये मी अशा संपूर्ण पद्यपंक्ती उद्‌धृतही केल्या आहेत, आणि हे कोणाच्या लक्षातही आलेलं नाही.

आपली लेखी भाषा ही शक्य तेवढी जास्तीत जास्त सुस्पष्ट आणि सोपी असली पाहिजे, एकही शब्द अधिक किंवा उणा नको. आज ज्या द्वारे शब्दाचा संतापजनक दुरुपयोग केला जातो, असे फुगवलेले फुलोऱ्याचे शब्द किंवा नवे पढित शब्दही नकोत, असे शब्द हे लिहिणाऱ्याकडे प्रामाणिकपणे कसदार असं सांगण्यासारखं काही नाही, ही वस्तुस्थिती लपवण्याचाच पुष्कळदा प्रयत्न करतात. प्राचीन रोमन 'काटो' हा लेखकांना सल्ला देतो, की "Rem tene, verba sequentur"– म्हणजे "विषयाला नीट घट्ट धरून ठेवा, म्हणजे शब्द आपणहून त्याला अनुसरतील." हा सल्ला पाळण्याचा मी प्रयत्न केला आहे. हे मला साधलं आहे की नाही, हे इतरांनी ठरवावं.

**विदेशी भाषा विभाग, पुणे विद्यापीठ,**
**रानडे इन्स्टिट्यूट परिसर, पुणे ४११ ००४.**

---

## वनस्पतीतही 'दलित'

**म. वि. आपटे**

बेल, जाई, बाहवा यांची पाने अनेक ठिकाणी मध्यशिरेपर्यंत निसर्गतःच विभागलेली असतात. अशा विभागांना पर्णिका म्हणतात. तीच दलेही होत. बेलाला तीन किंवा पाच दले असतात. जाईला पाच किंवा सात दले असतात. बहाव्याच्या पानाला तर दहा किंवा बारा दले असतात. आकाशनिंबाचे पान पाहिले तर त्याला एकेका बाजूला पाच पाच दले असून शिवाय एकेक अग्रदलही असते. याच पानाच्या तळापासून तीन दलांना दुय्यम दलेही असतात. या दलातलेही एकेक दल पुन्हा एकवार दलित असते. एकूण पान अंशतः त्रिवार दलित असते.

**वनश्रीसृष्टी खंड १, मुंबई, १९७२, पृ. ३९-४०**

# भाषिक खोड्या

विजया देव

माझ्या एका नात्यातल्या बाईंना 'हात मोडल्यासारखं होणं' हा वाक्प्रचार वापरायची खूप सवय होती. 'गॅस संपला की किती हात मोडल्यासारखं होतं नाही ?' असं त्या म्हणत आणि त्याच धर्तीवर 'पाणी आलं नाही,' 'मोलकरणीनं दांडी मारली' अशा कित्येक प्रसंगी. माझं तेव्हा शाळकरी वय होतं. त्यामुळे गॅस, मोलकरीण यांनी अडचणीत आणलं की कसं होतं याचा अनुभव तेव्हा नव्हता, पण हात-पाय वगैरे मोडण्याचा होता. त्यामुळे त्या असं कळवळून म्हणाल्या की मला वाटायचं, यांचा प्रत्यक्ष हातच मोडल्यावर त्यांना कशासारखं वाटत असेल ? मोलकरीण न आल्यासारखं की गॅस गेल्यासारखं ? पण मी हे काहीच कधी बोलून मात्र दाखवलं नव्हतं.

आज असंच काहीतरी मी बोलते तेव्हा माझी मुलगी, भाची मात्र त्यावर ताशेरे ओढल्याशिवाय राहात नाहीत . . . आता नेमकं हेच वाक्य त्या वाचतील तेव्हा मला केवढं ऐकून घ्यावं लागेल ! कारण 'ताशेरे ओढणं' हा किती अर्थशून्य वाक्प्रयोग आहे ! 'ताशेरा' हा काय प्रकार आहे, तो ओढायचा म्हणजे काय करायचं आणि ती एक दोरीसारखी ओढायची वस्तू असली तरी तिचा, माझ्या बोलण्यावर त्या जो आक्षेप घेतात, त्याच्याशी काय संबंध ?

तेव्हा 'ताशेरे ओढणं' हा वापरून गुळगुळीत झालेला, मूळ वाच्यार्थ माहीत नसलेला भाषाप्रयोग आहे असं मी त्यांना सांगून तो कसा वापरला जातो याची आणखी उदाहरणं देईन. निष्पन्न एवढंच होईल की हा आणखी एक वाक्प्रयोग आमच्या घरातून हद्दपार केलेला आहे असा कडक हुकूमनामा निघेल.

तर, मी एकदा म्हटलं, 'काय भलत्यावेळी येऊन दत्त म्हणून उभे राहतात हे लोक !' झालं ! त्यावर मग, एखाद्याच्या घरी जायचं आणि दारातच 'दत्त !' असं उच्चारून तटस्थ उभं राहायचं ही गोष्ट किती हास्यास्पद, विनोदी आहे; कुठला शहाणा माणूस असं करू शकेल यावर त्या दोघींनी माझी बरीच हजेरी घेतली आणि ही मराठी भाषा बदलायला पाहिजे असं ठणकावून सांगितलं.

एवढ्यावरच हे प्रकरण थांबलं नाही. पुढे माझ्या मुलीनं तिच्या मावसबहिणीला असंही सांगितलं की पुढच्या वेळी तू खूप दिवसांनी आलीस आणि मी दार उघडलं की तू बाकी काही न बोलता, आत न येता 'दत्त !' असं मोठ्यानं म्हण. असली आपल्याला वेडगळ ठरवणारी कल्पना आपल्यापेक्षा लहान बहिणीकडून ऐकून घ्यावी लागतेय आणि तीही मराठी भाषेच्या या विक्षिप्तपणामुळे हे तिला सहन होणं शक्यच नव्हतं.

आपल्या भाषेला नावं ठेवण्यात तुम्ही एकमेकींची री ओढताय, मराठी अभ्यास परिषदेच्या हे कानावर गेलं तर खैर नाही तुमची म्हणून मी त्या दोघींना झापायच्या बेतात होते, पण पुन्हा त्या 'री'नं माझा घात केलाच. 'शी, शी! आम्ही री-बी काही कुणाची ओढत नाही आहोत. आम्हाला हे असलं बोलणं पसंत नाही इतकंच!' त्या म्हणाल्या.

अर्थात या सगळया प्रकारात मी त्यांना आतून सामीलच आहे याचा सुगावा आतापर्यंत लागलेला आहे. त्यामुळे खिल्ली प्रयोग दिवसेंदिवस जोरात चालू आहे. पण माझी सरावाची भाषा आणि त्यांची भाषेबद्दलची अतिरिक्त संवेदनशीलता यांच्यामुळे मुद्दा राहतो बाजूला आणि खल होतो शब्दांचा.

आता 'एखाद्या विशिष्ट गोष्टीवर डोळा ठेवणं' हे काही तितकंसं त्रासदायक वाटायला नको, नाही का? पण नाही. 'डोळा असा काढायचा आणि किल्ली किंवा रुमाल टेबलावर ठेवल्यासारखा, कशावर तरी ठेवायचा हे किती त्रासदायक आणि भेसूर!

'अंमळ', 'ढब', 'डूब' हे तर केव्हाच मोडीत काढायला हवे होते असे शब्द. 'सांगणे' इतका साधा, सुटसुटीत पर्याय चांगला हाताशी असताना 'कानावर घाल' हे कांय खूळ?

या गतीनं वजाबाकी चालली तर शेवटी खाणाखुणांवरच भागवावं लागेल अशी मला धास्ती वाटते. कारण 'गवार', पडवळ या भाज्यासुद्धा केवळ नावं वाईट म्हणून आवडत नाहीत. पण त्याचवेळी आमच्याकडे नवीन प्रयोगही होत असतात. आणि सगळयाच वाक्प्रचारांना असतो तसा त्याला मुळातला काही तरी अर्थ, संदर्भही असतो. प्रश्न एवढाच की ही बोली आमच्या घरापुरतीच मर्यादित राहते. पण त्यात ताजेपणा आहे आणि म्हणून गंमत आहे.

आम्ही तिघी एकदा कुणाकडे तरी चाललो होतो रिक्षातून. माझी मुलगी म्हणाली, 'आत्ता ते भेटलेच नाहीतं म्हणजे?' तिचा दुष्ट विचार हाणून पाडायला म्हणून मी म्हटलं, 'ए, हिला इथेच उतरवा बघू.' हे त्या दोघींनी ताबडतोब उचललं. आणि आता एखाद्याचं वागणं, कल्पना पसंत पडली नाही की त्या व्यक्तीला आम्ही ताबडतोब उतरवलेलं असतं. असं बऱ्याच जणांना बऱ्याच कारणांमुळे उतरवून, उतरवून खाली गर्दी होते. मग, भावांचं, वडलांचं वागणं फारच मनाविरुद्ध झालं की त्या धमकावतात, 'तुम्हाला कायमचं खाली उतरवले आहे! कितीही गर्दी झाली तरी वर घेणार नाही.' मी काही काम त्यांना सांगितलं की मला उतरवणं हे तर नित्याचंच आहे.

एकदा आम्ही आमच्या एका स्नेह्यांच्या घरी गेलो होतो. तिथे सगळयांच्याच गप्पा रंगल्या. अशा वेळी बरेचदा होतं तेच झालं. सगळयांच्या उलटसुलट बोलण्यात त्या घरातल्या बाईंचं एक वाक्य काही केल्या पुरं होईना. त्या इंग्लिशमध्ये बोलत होत्या. एका कंपनीच्या टाळेबंदीबद्दल सांगताना त्या परतपरत 'But the manager . . . ' याच्यापुढे जाऊच शकत नव्हत्या. शेवटी पाचवेळा हा प्रकार होऊन सहाव्यांदा त्यांनी हार न मानता जवळ बसलेल्या एका लहान मुलीला हे वाक्य पुरं ऐकवलं.

आमच्या दोघांच्या हे काहीच लक्षात आलं नाही. नंतर या दोघींनी सांगितल्यावर आठवलं, असं काही तरी झाल्याचं. पण खरी कल्पकता पुढेच आहे. त्यातून आम्हाला नवीन वाक्प्रचार मिळाला. त्या बरोबर नसत्या तर तो आमच्या घरात निर्माण झाला नसता. तो म्हणजे एखाद्याचा 'बट द मॅनेजर' होणं. बोलतानाच नव्हे तर कुठलीच गोष्ट पहिल्या फटक्यात न जमता दहा वेळा अर्धवट राहणं अन् नेटानं पुरी करायला जाणं. पोळया करताना फोनची, घराची घंटी, भाजीवाला, धोबी असे सतरा अडथळे आले की झाला पोळयांचा 'बट द मॅनेजर'.

गेल्या वर्षी, जुलैमध्ये एका रविवारी सकाळी थोडं सामान आणायला मी वाण्याच्या दुकानात गेले. दुकान नुकतंच उघडलं होतं. अजून गिऱ्हाईक यायचंच होतं. जुलै महिना असून पावसानं चांगली पंधरा दिवस विश्रांती घेतली होती. मी दुकानात शिरले आणि काय हवंय ते सांगायच्या आधीच, आमच्या नेहमीच्या दुकानदारानं पाऊस कसा गायब झालाय हे सांगायला सुरुवात केली. आधीच मोठे असलेले त्याचे घारे डोळे आणखी गरगरीत झाले आणि काळजीनं, त्रासिकपणानं हातवारे करत बाहेर आकाशाकडे पाहात 'पाऊस नाही, अजिबात पाऊस नाही ! आणि मी सांगतो, मुख्य म्हणजे पाण्याचा प्रॉब्लेम होणार आहे !' हे माझा अपराध असल्यासारखं, दुकानातल्या नोकरांच्या साक्षीनं त्यानं मला ऐकवलं. मी तो अपराध मान्य केल्यावरच मला सामान मिळालं.

हे मी घरी आल्याबरोबर या जागरूक मुलींना सांगितलं. तेव्हापासून कुठलीही गोष्ट नसणं, न मिळणं, हातून न होणं यावर ही मल्लिनाथी केली जाते. एखाद्या दिवशी दूध संपलं तर 'दूध नाही, अजिबात दूध नाही, मी सांगते आमच्या आरोग्याचा प्रॉब्लेम होणार आहे.' कॉलेजात लेक्चर्स झाली नाहीत तर 'लेक्चर नाही, अजिबात लेक्चर नाही, मी सांगते शिक्षणाचा प्रॉब्लेम होणार आहे' अशी शेकडो वाक्यं तयारच असतात.

या भाषिक खोडसाळपणाला अंत नाही.

प्रचलित भाषा दर पिढीला अर्थहीन वाटायला लागते आणि त्या असमाधानातून जुने प्रयोग धुडकावून नवे रुजवले जातात, त्याची ही झलक.

**सुप्रिया, ६१/१४ एरंडवन, प्रभात रस्ता, गल्ली क्र. १४, पुणे ४११ ००४.**

# लेख लिहिण्याचं हळवं निमित्त

**इरीना ग्लुश्कोव्हा**

लेख लिहिण्याची निमित्तं निरनिराळी असतात. कधी नवीन माहिती मिळते, तर कधी नवीन विवेचन सुचतं. या दोन निमित्तांचा आधार लाभला नाही तर आणखी काही गोष्टी लिहिण्याच्या स्फूर्तीला कारणीभूत होऊ शकतात. प्रस्तुत लेख लिहिण्याचं निमित्त मात्र एकदम खासगी आहे. मी मराठी शिकण्यासाठी पुण्याला पहिली भेट देऊन वीस वर्षं पूर्ण झाली आहेत. मराठी साहित्यात आत्मचरित्रपर लेखन हा एक आवडता प्रकार नसता तर कदाचित मी पण स्वतःपुरतं बोलले नसते. पण मराठी आत्मचरित्रपर लेखनाच्या प्रचंड आणि अखंड परंपरेनं प्रभावित होऊन मी अनेक खंड न लिहिता तिळाएवढा लेख लिहायचं मनावर घेतलं आहे. माझं कारण जरी खासगी असलं तरी लेख लिहिला तर त्याच्याकडे वाचकांचं लक्ष जाऊन त्याला व्यापक महत्त्व मिळू शकेल अशी अहंकारी कल्पना मला आली आणि लिहिण्याचा अर्थपूर्ण विषय नसतानाही मी स्वतःसमोर कागद ओढले.

गेली वीस वर्षं माझं आयुष्य मराठी भाषेपासून अतूट आहे. म्हणून **भाषा आणि जीवन** या त्रैमासिकाचं नाव मला कधी-कधी खटकतं. जणू 'भाषा' आणि 'जीवन' एकमेकांपासून वेगळं करता येत असावं. माणूस प्रत्यक्ष ध्वनी उच्चारत नसला तरी त्याच्याकडून करण्यात येणारा हावभाव हीच त्याची भाषा होय. जोपर्यंत माणसाची भाषा ऐकू किंवा दिसून येते तोपर्यंत त्याचं जीवन खऱ्या अर्थानं चालूच असतं. शिवाय **भाषा आणि जीवन** या त्रैमासिकाचं माध्यम मराठी भाषा असून त्यातला मजकूर मुख्यतः मराठी भाषेशी संबंधित असल्यामुळे या मासिकाच्या मथळयातली 'भाषा' म्हणजे मराठीच होय हे गृहीत धरायला पुरेसं कारण दिसतं. म्हणून या त्रैमासिकाचं नाव नुसतं 'मराठी' असं ठेवलं असतं, तर माझ्या संदर्भात निदान 'भाषा' म्हणजेच 'जीवन' असं ठरलं असतं. मराठी भाषेचा अभ्यास करून मी डॉक्टरेट केलं, मराठी भाषेची प्राध्यापिका म्हणून मला मॉस्को राज्य विद्यापीठात नोकरी मिळाली. विद्यार्थ्यांना शिकवण्याचा वैताग आल्यामुळे महाराष्ट्राच्या संस्कृतीचं संशोधन करण्याच्या हेतूनं मी रशियन पौर्वात्य विद्या संस्थेमध्ये दाखल झाले आहे. हे तर काय, अधूनमधून माझी झोपमोड होते, तेव्हा सुद्धा एखाद्या मराठी व्यक्तीच्या आत्मनिवेदनाची दोन-तीन पानं वाचून डोळा लागत असतो आणि वेगळं झोपायचं औषध लागतच नसतं ! म्हणजे ही मराठी नुसतं जीवन तर नव्हेच, ती जीवनदायक, अर्थातच झोपदायक देखील आहे.

माझ्या मॉस्कोच्या घरी तशी पुष्कळ मराठी पुस्तकं आहेत. काही पुस्तकं मी पुण्यातल्या दुकानांतून विकत घेतली आहेत, तर काही मला भेट म्हणून मिळाली आहेत. त्यांच्यात जुन्या, म्हणजे दुसऱ्या कुणी आधी वापरलेल्या पुस्तकांचाही समावेश आहे. ती पुस्तकं माझी सर्वात आवडती आहेत. या पुस्तकांवरून काळाच्या प्रवाहाची तीव्र जाणीव होते. त्यांच्या पिवळट आणि किंचित फाटलेल्या पानांवरून गेल्या दशकांच्या वासाचा भास होतो. काही पुस्तकांतल्या काही ओळींखाली वेगवेगळया रंगाच्या शाईच्या रेघा काढलेल्या सापडतात, बाजूला खुणा दिसतात. म्हणजे कोणीतरी कधीतरी हे पुस्तक अगदी मन लावून वाचलेलं असावं. ही जुनी पुस्तकं मी फार उत्सुकतेनं चाळते, चाळत पाहते – कुठे हॉटेलचं बिल किंवा रोखीची पावती सापडते, तर कुठे दिवाळीच्या शुभेच्छा देणारं पोस्टकार्ड. पुस्तकात ठेवलेली आणि सुकून गेलेली फुलं आणि झाडांची पानं पण सापडतात. कधी जुईची, तर कधी जाईची. १९३४ मध्ये छापलेल्या एका पुस्तकामध्ये मला पानाशी चिकटलेली मुंगी सापडली. ती मुंगी पण १९३४ ची असेल की नंतर केव्हातरी कुतूहल म्हणून तिनं या पुस्तकात शिरून समाधी घेतली असेल?

पुस्तकात अडकलेले कागदाचे तुकडे पण सापडतात. कोणीतरी पुस्तक खराब होऊ नये म्हणून हे तुकडे खुणेचा कागद म्हणून उपयोगात आणले असावेत. त्या तुकड्यांवर वाक्यखंडातले दोन-दोन तीन-तीन शब्द दिसून येतात. या अपूर्ण वाक्यांवरून चिठ्ठीचा किंवा पत्राचा थोडा अर्थ कळतो आणि मी दुसऱ्या व्यक्तीच्या आयुष्यातल्या प्रसंगांची आणि विचारांची पुनर्निर्मिती करण्यात गुंतून जाते. मला भेट म्हणून मिळालेली काही पुस्तकं आधी सुद्धा कोणीतरी कोणालातरी भेट म्हणून दिलेली होती, हे पहिल्या पानावरच 'सप्रेम भेट' या केलेल्या खुणेवरून ओळखता येतं. हे पाहून मला विलक्षण वाटायला लागतं. ज्यांच्याशी माझी प्रत्यक्ष ओळख कधीच नव्हती, त्यांच्याच 'प्रेमाचा' संकेत माझ्या हाताला लागलेला आहे. आणि या अनोळखी माणसाशी मी संपर्क साधलेला आहे. कधीतरी मी थकलेली, त्रासलेली असते, तेव्हा घरी साठलेल्या मराठी पुस्तकांचं नुसतं दर्शन घेऊन मला चैन पडते. पदस्पर्श शक्य नाही म्हणून ती तहान मी नुसत्या स्पर्शातच भागवते आणि मग आनंदच आनंद. म्हणजे, 'भाषा आणि आत्मानंद' हे नाव त्रैमासिकाला शोभणारं नाही का?

अर्थातच सर्वांच्या आवडीनिवडी जुळल्या पाहिजेत, असं नाही. उदाहरणार्थ, मराठी माणसं संस्थांच्या स्थापनेचे महोत्सव साजरे करण्यात पटाईत असतात, पुण्यतिथींचा कार्यक्रम पण करत असतात. त्या मानानं वैयक्तिक सणांकडं त्यांचं तितकंसं लक्ष नसतं. आम्ही रशियन माणसं वाढदिवस न चुकता साजरा करतो, लग्नाचे वाढदिवससुद्धा बारकाईने मोजतो. लग्न होऊन एक वर्ष लोटलं म्हणजे आम्ही लग्नाचा 'कागदाचा' वाढदिवस साजरा करतो. दोन वर्षं लोटली की 'सुताचा' वाढदिवस, आणि पाच वर्षं लोटली की 'लाकडाचा' वाढदिवस साजरा करतो. नवराबायकोचा वीस वर्षांचा सहवास

झाला की 'fine china'चा (म्हणजे उंची चिनी मातीचा ?) वाढदिवस साजरा करतो. हा लेख लिहायची ऊर्मी झाली, तेव्हा या रिवाजावरून माझा आणि मराठी भाषेचा वीस वर्षांचा सहवास लक्षात घेऊन 'माझं fine-china wedding' हे शीर्षक नकळत निर्माण झालं. ही कल्पना मला आवडली. शिवाय 'कानडीनें केला मऱ्हाटा भ्रतार। एकाचें उत्तर एका न ये।' ही तुकारामाची ओळ आठवली. यावरून थोडी गम्मत करून सबंध लिहिण्याला 'लग्नाचा वेष' द्यावासा वाटला. पण मी आणि मराठी भाषा यामध्ये बायको कोण आणि नवरा कोण हे ठरवायची पंचाईत आली. मी पुरुष असते, तर हा प्रश्न आला नसता. पण मी स्त्री असल्यामुळे जरी 'भाषे'च्या माध्यमानं हा प्रश्न सोडवता येत असला, तरी तो 'जीवना'च्या पलीकडचा राहील. यामुळे **भाषा आणि जीवन** या त्रैमासिकाच्या चौकटीत माझा लेख बसावा म्हणून हा लग्नाचा गोंधळ मी गाळला आहे. असो. इथे हळवं का होईना, लेख लिहायचं निमित्त संपलं आहे.

**भारतीय विद्या केंद्र, पौर्वात्य विद्यासंस्था,**
**१२, रोझ्देस्त्वेंका, मॉस्को १०३७५३, रशिया**

---

* (एरवी हरिहरपुत्र (विष्णु आणि शिव यांचा मुलगा) ही प्रतिमा हिंदू पुराणकथांत असल्यामुळे या ठिकाणी पण काही तरी युक्ती करून खुलासा करता आला असता का ?)

# आकड्यांची भाषा

नीलिमा गुंडी

मुक्ता शाळेत जाऊ लागल्यापासून तिच्या भाषेला नवे पैलू पडत आहेत. विशेषतः तिच्या भाषेवर गणितातल्या आकड्यांनी केलेले संस्कार; हा मला एक खास अनुभव वाटला.

ती शिशुशाळेत असतानाची गोष्ट. तेव्हा तिला आकड्यांची जुजबी ओळख होऊ लागली होती. लहान आकडे कोणते, मोठे आकडे कोणते याचा साधारण अंदाज येऊ लागला होता. एक दिवस तिने मला एकदम प्रश्न केला : "आई, तुझं वय काय ?'' त्यावर मी "अडोतीस", असे उत्तर दिल्यावर ती ओक्साबोक्शी रडू लागली. मला तिची ही प्रतिक्रिया क्षणभर उमगेना. ती आकड्यांविषयी इतकी संवेदनशील असेल, याची मला कल्पना आली नाही. मग माझ्या लक्षात आलं की तिच्या वयाच्या हिशेबात तिला 'दहा-वीस' हे आकडेच जेथे प्रचंड मोठे वाटत आहेत, अशा वेळी 'अडोतीस' हा आकडा तिला धक्कादायकच वाटला असणार. मग तिला या धक्क्यातून बाहेर काढण्यासाठी मी तिच्या ओळखीच्या नात्यातल्या अनेक मोठ्या व्यक्तींची वये सांगितली. शेवटी सांगितले की तिला माहीत असलेल्या एका आजींचे वय 'नव्वद' आहे. माणूस किती जगू शकतो, या विषयीही तिच्या मनात असा थोडा विश्वास निर्माण केला. तेव्हा ती शांत झाली.

पुढे तिची उजळणीची मजल शंभरपर्यंत सहजपणे जाऊ लागल्यावर 'शंभर' हा तिच्या रोजच्या भाषेतला एक वाक्प्रचारच होऊन बसला. "आजीकडे किती दिवस राहणार ?" तिचे उत्तर तयार असेः "शंभर दिवस". कधी कधी प्रश्नही तीच विचारी आणि उत्तरही तीच देई, "आई, देव इतकुसा दिसतो, पण त्याचं वय काय असेल ?" आणि स्वतःच डोळे विस्फारून उत्तर देई : "शंभर". थंडीच्या दिवसात तपमानाचे टी. व्ही. वरचे आकडे ऐकून तिने एकदा पटकन म्हटले : "आई, तापमान शंभर अंश होईल, तेव्हा किती थंडी पडेल !"

तिचे बाबा कधी काही कारणाने घरी उशीरा येणार असतील तर त्यांची वाट पाहून कंटाळल्यावर ती म्हणणार : "आई, मी शंभरपर्यंत म्हणते. त्याच्या आत बाबा आले पाहिजेत हं." आणि नव्व्याण्णवपर्यंत म्हणून थांबणार नि मला म्हणणार, "मी अजून 'शंभर' म्हटलेलं नाही." तेव्हा 'शंभर' ही अशी तिच्यालेखी अनेक गोष्टींची कमाल मर्यादा आहे.

स्वतःचे वय आणि मैत्रिणींची वये यांच्या आकड्यांची तुलना करणे; त्यातून कोण

लहान, कोण मोठे ते ठरविणे; हा तर या वयात एक खेळच आहे. गंमत म्हणजे त्यांच्या चार-पाच वर्षांच्या चिमुकल्या वयामध्येही भूतकाळाचा मोठा कप्पा असतो. त्यांच्या गप्पांमध्ये 'मी लहान होते तेव्हा' असी सुरुवात करून अगदी कालपरवापर्यंतच्या नोंदी त्यात केलेल्या दिसतात. तेव्हा वाटतं, यांच्या मनाच्या कॅन्व्हासवर हे आकडे कोणत्या स्केलमध्ये रेखाटलेले आहेत?

मुक्ताला पहिलीत गेल्यावर या सगळया आकड्यांआधीचा शून्य हा आकडा शाळेत शिकविला गेला तेव्हा ती संकल्पना तिला फारच रुचली. घरी आल्यावर ती मला शिकवू लागली, "आई, काही उरलं नाही असं म्हणायचं नाही. शून्य उरलं, असं म्हणायचं!" त्यामुळे काही दिवस आमच्याकडे नकारार्थी क्रियापदांची उचलबांगडी होऊन त्याऐवजी शून्याची प्रतिष्ठापना झाली होती. म्हणजे असं की अमुक गोष्ट घरात 'नाही' म्हणायची सोय नव्हती; ती गोष्ट 'शून्य आहे' अशी तावडतोब तिच्याकडून दुरुस्ती यायची. शून्य हा आकडा मला आजवर पोकळ, अर्थशून्य वाटत आला होता, तो इतका भरगच्च असू शकतो, हा साक्षात्कार हृद्य होता.

आकडे हे अजून तिच्या दृष्टीने स्वतंत्रपणे परिपूर्ण आहेत. म्हणजे ते वेळ, वस्तू, रुपये यांच्याशी निगडित होऊन वेगवेगळया पद्धतीने अर्थपूर्ण होतात, हे तिला नीट उमजलेले नाही. त्यामुळे "आई, तू पाळणाघरातून न्यायला चारला ये." असे तिने मला बजावले असेल आणि मी चार नंतर किंवा चारच्या आधी गेले तरीही ती म्हणणार, "चारला नाही ना आलीस. तू खोटं बोललीस." तिच्या दृष्टीने आकडे – फक्त आकडेच काय प्रत्येक उच्चारित शब्द – ही एक परमपवित्र गोष्ट आहे.

**६/७०, लोकमान्य नगर, नवी पेठ, पुणे ४११ ०३०.**

---

## अबोलीची फुलं

सुभूती हा बुद्धाचा शिष्य. जिथे शाश्वत, चिरंतन सत्य आणि अशाश्वत आभास एकच होऊन जातात. अश्या वैश्विक शून्यतेचा त्याला साक्षात्कार झाला. एका झाडाखाली या विलक्षण आनंदाचा अनुभव घेत तो बसलेला असताना झाडाने त्याच्यावर पुष्पवर्षाव सुरू केला आणि त्याला आकाशवाणी ऐकू आली – "शून्यतेसबंधी तू जे उद्‌गार काढलेस, त्याबद्दल आम्ही तुझा सत्कार करतो आहोत."

"पण मी तर काहीच बोललो नाही शून्यतेबद्दल !" सुभूती पुटपुटला.

"ना तू काही बोललास, ना आम्ही काही ऐकलं. ही खरी शून्यता !" पुन्हा आकाशवाणी आली आणि फुलांचा जणू काही पाऊस पडायला लागला.

**झेन कूटकथा (प्रेषक : माधवी कोल्हटकर, पुणे)**

# अनुवादातील क्रमपरिवर्तनामुळे अर्थहानी

सीताराम रायकर

भाषा आणि जीवनच्या अनुवाद विशेषांक–उत्तरार्ध (अंक १-२ हिवाळा–उन्हाळा १९९३) मध्ये 'अनुवाद : शास्त्र की कला ?' हा डॉ. अशोक केळकर यांचा लेख प्रसिद्ध झाला आहे. त्यामध्ये पान ९ वर 'अर्थग्रहण–१' बद्दल कसा घोटाळा उत्पन्न होऊ शकतो याचे सोदाहरण विवेचन आहे. मर्ढेकरांच्या कवितेतील 'तुझ्या आवडीचे' या शब्दांच्या इंग्रजी भाषांतरात आढळणाऱ्या फरकाविषयी ते म्हणतात, "हा प्रश्न मुख्यतः 'तुझ्या आवडीचे' या शब्दांच्या अर्थग्रहण–१ बद्दलचा प्रश्न आहे." ते पुढे म्हणतात, "असले घोटाळे टळण्यासाठी अनुवादकाच्या ठायी मूळ भाषेत उत्तम नैपुण्य असायला पाहिजे. . ."

पण कधीकधी अनुवादकाच्या ठायी मूळ भाषेत उत्तम नैपुण्य आहे त्याला संदेशग्रहण, अर्थग्रहण उत्तम रीतीने करता येते याबद्दल मुळीसुद्धा शंका नसूनही डॉ. केळकरांनी दिलेल्या उदाहरणापेक्षा निराळ्या प्रकारचा घोटाळा निर्माण होऊ शकतो. असा घोटाळा अनुवादक मूळ लेखकाच्या मांडणीमध्ये फेरफार करतो त्यावेळी होतो. अशा फेरफारामुळेही मूळ अर्थातून प्रकट झालेला भास, अर्थाभोवतीची वलये यातही बदल होतात. याबाबत मला जाणवलेला प्रश्न येथे मांडीत आहे.

विनोबा भावे यांनी भगवद्गीतेचा केलेला समश्लोकी अनुवाद, 'गीताई' सर्वांना परिचित आहे. पहिल्या अध्यायातील पहिला श्लोक असा आहे :

धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः।<br>
मामकाः पाण्डवाश्चैव किमकुर्वत संजय ॥ १ ॥

या श्लोकाचा अनुवाद विनोबा भावे यांनी पुढीलप्रमाणे केला आहे :

त्या पवित्र कुरुक्षेत्री पांडुचे आणि आमुचे<br>
युद्धार्थ जमले तेव्हां वर्तले काय संजया ॥ १ ॥

या अनुवादामध्ये 'मामकाः पाण्डवाश्चैव' हा मूळ क्रम बदलला आहे असे दिसते. हा बदल वृत्तविषयक बंधनांमुळे झाला आहे असे स्पष्टीकरण शक्य आहे. पण आसली अडचण विनोबांना नक्की दूर करता आली असती. तितके भाषाप्रभुत्व त्यांच्या ठायी नक्कीच होते. शिवाय इतर काही मार्गांचा त्यांना उपयोग करता आला असता. उदाहरणार्थ याच अध्यायातील चौथ्या श्लोकातील 'युयुधानो विराटश्च' या शब्दांचा अनुवाद त्यांनी 'विराट नृप सात्यकी' असा केला आहे. (एका विशेष नामाऐवजी त्याच व्यक्तीचे दुसरे

नाव)

मूळ क्रम बदलल्यामुळे अनुवादाचा वाचकाच्या दृष्टीने अर्थग्रहणामध्ये काही फरक पडतो का? अर्थग्रहणामध्ये मूळ लेखकाला अभिप्रेत असलेले भाव, अर्थवलये यांचाही नक्कीच समावेश असतो. प्रस्तुत श्लोकावर भाष्य करताना अनेकांनी व्यासांच्या मुळातल्या शब्दरचनेमुळे (तो मामकाः आधी म्हणतो) धृतराष्ट्राला आपल्या मुलांबद्दल असलेले अति आंधळे प्रेम सूचित करायचे आहे, याची नोंद घेतली आहे. म्हणजेच या संवादात सहभागी असणाऱ्या आणि ज्या व्यापक कलाकृतीमध्ये - महाभारतामध्ये - भगवद्‌गीतेचा अंतर्भाव आहे, त्या कलाकृतीमध्ये महत्त्वाची भूमिका असणाऱ्या एका व्यक्तिरेखेविषयक काही अर्थपूर्ण सूचनाच त्या 'मांडणी'मध्ये आहे. या सूचनेचा बोध होणे हाही अर्थग्रहणाचाच भाग आहे. विनोबांनी केलेल्या फेरफारामुळे धृतराष्ट्राविषयी असा भाव किंवा अशा प्रकारचे अर्थवलय निर्माण होऊ शकत नाही.

पहिल्या अध्यायातच आठव्या श्लोकामध्ये दुर्योधन द्रोणाचार्यांना कौरवसैन्यातील योध्द्यांविषयी सांगत आहे. या श्लोकाची रचना व्यासांनी अशी केली आहे :

भवान् भीष्मश्च कर्णश्च कृपश्च समितिंजयः।
अश्वत्थामा विकर्णश्च सौमदत्तिस्तथैव च ॥ ८ ॥

यातील पहिल्या ओळीचा अनुवाद विनोबांनी पुढीलप्रमाणे केला आहे :

स्वतां आपण हे भीष्म यशस्वी कृप कर्ण तो।

व्यासांनी त्यांच्या रचनेमध्ये नावांचा क्रम काही विशिष्ट अर्थवहनासाठीच योजला आहे असे दिसते. द्रोणाचार्य हे दुर्योधनाचे गुरू आणि कौरवसैन्याचे सेनापती आहेत. त्यांच्याविषयीचा आदर व्यक्त करण्यासाठी आणि दुर्योधन त्यांनाच संबोधित असल्यामुळे त्यांचा उल्लेख प्रथम करणे आवश्यक आहे. भीष्म हे कौरवकुलाचे पितामह असल्यामुळे त्यांचा उल्लेख द्रोणाचार्यांच्या नंतर होणे औचित्याला धरूनच आहे. या दोघांनतर दुर्योधन कर्णाचे नाव घेतो हे अतिशय अर्थपूर्ण आहे. या दोन व्यक्तिरेखांमधील परस्पर संबंधांचे आणि दुर्योधनाला कर्णाबद्दल वाटणाऱ्या भावांचे त्यात सूचन करणारी ही शब्दरचना आहे. दुर्योधनाच्या लेखी कर्णाचे महत्त्व किती होते याचाही निर्देश नावांच्या या मांडणीत आहे. विनोबांनी केलेल्या अनुवादांमध्ये यशस्वी कृप ही शब्दरचना कर्णाच्या उल्लेखाच्या अगोदर येत असल्यामुळे व्यासांच्या रचनेतील मुळातला भाव व मूळ शब्दरचनेभोवती असलेले अर्थवलय निसटले आहे असे वाटते. केवळ 'गीताई' (म्हणजे अनुवाद) वाचणाऱ्या वाचकाला व्यासांना अभिप्रेत असलेल्या अर्थवलयांपासून वंचित रहावे लागणार.

**इंग्रजी विभाग, मॉडर्न महाविद्यालय, पुणे ४११ ००५.**

# मराठीतील पहिला अवतरणकोश

**परीक्षण लेखक – विजया देव**

*(एक सहस्र मराठी काव्य अवतरणांचा काव्य अवतरण कोश : डॉ. शशिकला गोरे / वासंती भोपटकर, प्रकाशक : चैतन्य साहित्य, पुणे, १९९३. मूल्य रु. ३०)*

आपले मनोगत लयबद्ध अशा पद्यपंक्तींमधून चपखलपणे व्यक्त करता येते हा सार्वत्रिक अनुभव आहे. म्हणी, दृष्टान्त यांच्याप्रमाणेच कविवचने हे लोकसंस्कृतीचे धन होते, ते त्यातील मार्मिक, सूत्ररूप आशयामुळे. मात्र हवे तेव्हा काव्यपंक्ती उद्‌धृत करायला मुळात वाचन, पाठांतर आणि स्मरणशक्ती दांडगी हवी. नाही तर मग अशा कविवचनांचा एखादा कोशच हाताशी हवा.

'काव्य अवतरण कोश' ही गरज काही अंशी भागवतो. डॉ. शशिकला गोरे आणि वासंती भोपटकर यांनी हा एक सहस्र पाच मराठी काव्य अवतरणांचा कोश संकलित-संपादित केला आहे. संस्कृत सुभाषितांची पखरण असलेले वक्तृत्व किंवा लेखन श्रोतृवर्गाला किती चटकन आकर्षित करते ते आपण पाहतोच. समर्पक मराठी काव्यही तितकेच हृद्य आणि अवतरणक्षम आहे हे ओळखून संपादकद्वयाने हा उद्योग केला आहे. विविध प्रकारचे निबंध, परिचयपर लेख, भाषणे अशावेळी आपल्या वर्ण्यविषयाचे मर्म सांगण्यासाठी म्हणून काव्यपंक्तींचा उपयोग आपल्याला हमखास होतो. तो परिणामकारक आणि अर्थबहुल असतो. पण एखादे वेळी असे होते की आपल्या विषयाशी संबंधित काव्यावतरण आहे हे चुटपुटते आठवत असते पण पाठांतर दगा देते. अशा वेळी असा कोश मदतीला येतो.

मराठीतील एक्क्याऐंशी ज्ञात कवी आणि क्वचित काही अनाम-अज्ञात कवी यांच्या काव्यांमधून ही अवतरणे निवडलेली आहेत. साधारणपणे १८८५ ते १९७० या कालखंडातील म्हणजेच केशवसुत, बहिणाबाई, अज्ञातवासी यांच्यापासून सुधीर मोघे यांच्यापर्यंत अनेक कवींची उपस्थिती या कोशात आहे. त्या त्या अवतरणाखाली कवीचे नाव व काव्यसंग्रहाचे नावही आहे. या कोशाची रचना अकारविल्हे क्रम लावून केलेली आहे. यात स्थूलमानाने कोणते विषय येतात यांची एक यादी तसेच अवतरणांचा अनुक्रमांक यांची सूची कोशाच्या शेवटी पुरवणीमध्ये आहे. शालेय आणि महाविद्यालयीन पातळीवरील विद्यार्थी आणि त्यांना मार्गदर्शन करणारा अध्यापक वर्ग यांना या संग्रहाची उपयुक्तता अधिक वाटेल.

या कोशाला प्रा. वसंत बापट यांची प्रस्तावना आहे. भाषेचे सामर्थ्य, सौंदर्य ते जाणतात-जपतात. त्यामुळे या कोशाचे मोल त्यांनी ओळखले आहे. तसेच प्रस्तुत कोशातील मर्यादाही नेमक्या सांगितल्या आहेत.

घरातील संस्कार, सुविद्य वातावरण आणि स्वतःचा अध्यापिकेचा पेशा यामुळे संपादिका डॉ. शशिकला गोरे यांना या कोशरचनेची प्रेरणा मिळाली. 'रात्रीच्या गर्भात उद्याचा असे उषःकाल' (कुसुमाग्रज), 'धर्मसूत्र हे मुखी परि करी मनुजाच्या तलवार' (विनायक), किंवा

'अशी धरित्रीची माया अरे तिला नाही सीमा
दुनियेचं सर्व पोट तिच्यामधी झालं जमा' (बहिणाबाई)

अशा सार्थ आणि चिरनूतन वचनांची निवड संपादिकांच्या परिश्रमाची साक्ष देते. पण संकलन करणाऱ्याची व्यक्तिगत आवड-निवड हाही निकष या संग्रहावर प्रभाव गाजवतो. कारण यातील १००५ अवतरणांमध्ये एकट्या माधव जूलियनांची पंच्याऐंशी, बी कवींची साठ तर यशवंतांची एकोणसाठ अवतरणे आढळतात.

ठराविक कालखंडातील निवडक कवींच्या लक्षणीय काव्यपंक्तींचे संकलन किंवा वेगवेगळया आशय-विषयांनुसार संस्मरणीय वचनांचा संग्रह असे उद्दिष्ट ठेवले असते तर हा कोश अधिक समतोल आणि उपयुक्त ठरला असता. पण अकारविल्हे क्रमाने ही अवतरणे दिलेली असल्याने एका पाठोपाठ येणाऱ्या वचनांमध्ये कवींचा कालानुक्रम किंवा आशयानुसार मांडणी असे सूत्र नाही. कवी आणि त्यांची अवतरणे तसेच यात आलेले विषय आणि त्यांचे अनुक्रमांक या दोन पुरवण्यांमुळे या उणिवेची थोडी भरपाई होते.

अशा प्रकारचा हा मराठीतील पहिला कोश असल्यामुळे, संदर्भसाहित्य म्हणून या कोशाचे महत्त्व निर्विवाद आहे. साधेच पण उठावदार मुखपृष्ठ आणि वाजवी किंमत या जमेच्या बाजू.

**६१/१४, एरंडवन, पुणे ४११ ००४.**

# शालान्त परीक्षेच्या अभ्यासक्रमात बदल

१९९७ पासून पुढे महाराष्ट्रातून जे विद्यार्थी शालांत परीक्षेला बसतील त्यांच्या अभ्यासक्रमात बदल झालेला आहे. या परीक्षेसाठी जे विषय घ्यावे लागतात, त्यातील भाषाविषयामध्ये हा बदल शिक्षण खात्याने केलेला आहे. या विद्यार्थ्यांना १९९७ पासून इंग्रजी आणि मराठी या भाषा सक्तीच्या होतील. तिसरी भाषा म्हणून हिंदी निवडता येईल किंवा हिंदी-संयुक्त घेता येईल. हिंदी-संयुक्त म्हणजे ५० गुणांसाठी हिंदी आणि उरलेल्या ५० गुणांसाठी आणखी एक भाषा. या आणखी एका भाषेसाठी नऊ भाषांमधून निवड करता येईल. त्यांची यादी अशी : पाली, अर्धमागधी, संस्कृत, फ्रेंच, जर्मन, पर्शियन, उर्दू, अरेबिक आणि रशियन.

सध्याच्या अभ्यासक्रमात इंग्रजी माध्यमात शिकणाऱ्यांना इंग्रजी आणि हिंदी या भाषा सक्तीच्या आहेत आणि तिसरी भाषा म्हणून मराठी, फ्रेंच, संस्कृत, सिंधी, गुजराती इ. विस्तृत यादीपैकी एक घेण्याची सोय आहे.

पण त्यामुळे इयत्ता आठवीपासून मराठी वगळून फ्रेंच, जर्मनसारख्या एखाद्या भाषेची निवड करून शालांत परीक्षेत उत्तीर्ण होता येते. तेव्हा महाराष्ट्र राज्यात मराठी भाषेला अभ्यासक्रमात योग्य ते स्थान मिळावं, तिच्यात प्रावीण्य मिळवावं म्हणून हा बदल नुकताच जाहीर झाला आहे. इंग्रजी माध्यमाच्या आणि कॉन्व्हेंट शाळांच्या चालकांना मात्र हा महत्त्वाचा बदल अनपेक्षित आणि धक्कादायक वाटतो. यावर त्यांनी तीव्र प्रतिक्रिया व्यक्त केलेल्या आहेत. कित्येकांनी तर संघर्षाचीच भूमिका घेतलेली आहे. गुजराती, कन्नड सारख्या मातृभाषा असलेल्या विद्यार्थ्यांना त्या त्या भाषांचा अभ्यास करण्याची संधी मिळणार नाही म्हणूनही शाळाचालक नाराज आहेत.

मराठी भाषेच्या अभ्यासाला अग्रक्रम मिळणार असल्याने अभ्यासक्रमातील हा बदल निश्चितच स्वागतार्ह आहे.

टाइम्स ऑफ इंडियामध्ये बुधवार, १९ जानेवारी १९९४ या दिवशी ही बातमी आलेली असून शाळाचालकांच्या तीव्र नाराजीला त्यात अग्रक्रम आहे.

शालान्त परीक्षा मंडळाचे या बाबतीत प्रसिद्ध झालेले मूळ परिपत्रक वाचून त्यावर सांगोपांग चर्चा होणे अतिशय आवश्यक वाटते.





अनुक्रमणिका

# काही कविता

श्याम विमल

## अस्मितेचा स्रोत

त्या दिवशी जेव्हा मी
रस्त्याच्या मधोमध चालू लागलो
तेव्हा पों-पों ऐकलं –
ब्रेकचा आवाज आणि
अश्लील शिवीगाळही
लगेच कानांमार्फत मला जाणवलं की
मी आहे.

*　　*

त्या दिवशी चालता चालता
गल्लीत झोपलेल्या कुत्र्याच्या शेपटीवर
माझा पाय पडला न पडला तोच
उडी मारून त्याने
फोडली माझी पिंढरी
लगेच त्वचेमार्फत मला जाणवलं की
मी आहे.

*　　*

त्या दिवशी मी
भल्या पहाटे धूपानी सुवासित खोलीत
ध्यान-मग्न होतो प्रभुभक्तीत
एवढ्यात गल्लीतून
नगरपालिकेची मैलागाडी निघाली
लगेच नाकामार्फत मला जाणवलं की
मी आहे.

*　　*

त्या दिवशी बटाट्याच्या भाजीत
मिठाच्या ऐवजी पडली साखर
अजाणता.

जेवताना जेव्हा पहिला घास तोंडात घातला
लगेच जिभेमार्फत मला जाणवलं की
मी आहे.

त्या रात्री
डोळयांत नीज नव्हती
कारण, ह्या निर्लज्ज डोळयांनी
कुणाच्या डोळयांचे
दुहेरी भाव वाचले होते
लगेच डोळयांमार्फत मला जाणवलं की
मी आहे.

*   *

## पाच बिल्वपत्रं

१) टेबलाच्या पलीकडे जो डाग बसलाय
तो टेबलाच्या अलीकडे
एक माणूस होता.

२) तिकडे तुमचे भोग
माईकवरून वायदे
इकडे आम्ही लोक.

३) मशाल त्याच्या हातात होती
अंधाराच्या देहावर
हळदी रंग उजळला होता.

४) उत्तरसुद्धा कान आहे
दक्षिणसुद्धा कान
तोंडात एकसारखी जबान.

५) ज्वाळेवर ताणलेला तळहात
सुळाच्या टोंकावर तळपाय
जीवन असंच चाललंय.

## गांवढ्याचा एक अर्ज

सेवेसी
नगर महोदय,
आपण– वाटल्यास मानू नका – घोडा आहात.
क्षमा करा, आपण माणसाच्या आंतील फोड आहात जो
चिघळलेला आहे, आपलं टेबलासमोर असणाऱ्याशी
कसं नातं असतं ?
खट्खट्खट् खट् खट्...
'युअर्स सिंसियरली' खाली सही करणारे
मला पक्की खात्री आहे. मारा गोळी माणसाला
युग सालं मशीन झालंय.
आपल्यातील आत्म्यात एक खिसा आहे
त्याला लांच वाहण्याची खोड आहे.
आपली मुलं सदा सहीसलामत राहोत
आपण कचेरीत नसून घरी आहात
आपण रस्ता आणि वाहनही आहात
खुर्चीवर 'सर'सुद्धा आहात
हजामत करा
सहीसलामत मरा – वेरी सॉरी – रहा.
धन्यवाद.

आपला
मुडदाबाद

**'विमल-वाटिका'**
**बी-९६, सेक्टर - २६, नॉयडा २०१ ३०१.**

# देशिकार लेणे : हनव

**पंडित आवळीकर**
**विजया तेलंग**

'लीळाचरित्रा'च्या उत्तरार्धात 'नेडरगांवी धाएरवडकीं इंद्रभटां हनवीं पुजा' (२९८) या नावची एक लीळा आहे. इंद्रोबांनी गोसावीयांची कशी पूजा केली याचे येथे वर्णन आहे.

या लीळेत एक वाक्य आहे : "इंद्रोबाचे गांठीं एकीये असुचीं हनवें होती." :

'हनवें' ऐवजी 'हनव' आणि 'हनय' असे दोन पाठ वि. भि. कोलते यांनी नोंदले आहेत. आणि शब्दकोशात अर्थ दिला आहे :

"हनव : एक सोन्याचे नाणे (?), केवडा." प्रश्न चिन्हावरून दिलेल्या अर्थाबद्दल कोलते साशंक आहेत हे स्पष्ट होते. आपण निःशंक असायला हरकत नाही. तसेच केवडा हा अर्थ स्वीकारण्यातली अडचणही येथे मांडायला हवी.

'आसु' या शब्दाचा 'सोन्याचे नाणे' हा अर्थ त्यांनीच अन्यत्र दिला आहे. 'गांठी' या शब्दावरून आणि तत्कालीन प्रथेप्रमाणे इंद्रभटानें वस्त्राच्या गाठीत बांधले होते ते द्रव्यं : फुले नव्हेत. 'तीएं'चा संबंध 'हनवें'शी आहे.

"काइ गा इंद्रेया : देओ स्वर्णीं फुलीं पुजिजताए" या सर्वज्ञांच्या उद्‌गारांत 'स्वर्णीं फुलीं' म्हणजे केवडा नव्हे. 'सुवर्णीपुष्पीं', 'सुवर्णफुलीं' ही रूपके आहेत : सोन्याच्या नाण्यांवरील 'सुवर्णपुष्पदक्षिणां समर्पयामि' या मंत्रातलण उल्लेख येथे आठवावा. तेथेही 'फुले' 'केवडा' असा अर्थ नाही. द्रव्याचाच तो निर्देश आहे. "ऐसा देओ काइसे नि पुजावा ?" या प्रतिप्रश्नांत साध्या फुलांनी कसा पूजावा – सोन्याच पुजला पाहिजे असा गर्भितार्थ आहे.

'हनव' हा शब्द मुळात 'हवन' असा असावा. 'पवन'चे पत्र्ह असे वर्णांतर होऊन सनलेले हे रूप कोकणीत आजही 'पवन' म्हणजे सोन्याच्या पुतळ्या. तो शब्द असा बनला आहे.

पोन्न > पोन > पवन

"पोन्न / पोन' म्हणजेच हळेगन्नडमध्ये सोने. त्याचे नंतरचे 'प > ह' प्रक्रियेत बदलणारे रूप 'होन्न' / 'होन' आपल्याकडील मराठीतील 'होन' (आणि 'होनाजी', 'होनराव' ही व्यक्ति–कुलनात्रे) व्युत्पादिण्याचा हा रास्त रस्ता आहे.

देवाला 'पुतळ्या' (सोन्याच्या) वाहण्याचा उपचारही जुनाच आहे

'केवडा' असा 'हनवें'चा अर्थ घेता येणार नाही. याचे आणखी एक कारण म्हणजे ही 'हनवें' 'एकीये आसुचीं'–एक आसु देऊन विकत घेतलेली होती. व्यवहार म्हणूनही

'सोने' देऊन पुतळ्याच घेतल्या असणे – केवडा – नव्हे; – अधिक शक्य आहे. 'कवडा' घ्यावे एवढे हे सोन्याचे 'आसु' नामक नाणे सामान्य होते काय? या सर्वांहुन 'हेनवें' म्हणजे 'पुतळ्या'च हे सिद्ध करणारा शब्द म्हणजे 'गांठी' देशिकर लेणे घडवणाऱ्या सोनियाच्या खाणी प्राचीन मराठी वाङ्मयात आणि हळेगन्नडमध्ये किती दडलेल्या व विखुरलेल्या आहेत आणि त्यांचे उत्खनन कोकणीच्या द्वारातून प्रवेश करून कसे करायला हवे याचे प्रत्यंतर यावे.

**मराठी विभाग, गुलबर्गा विश्वविद्याल, गुलबर्गा**

**टीपा :**

१) लीळाचरित्र, (सं) वि. भि. कोलते, महाराष्ट्र राज्य साहित्यसंस्कृती मंडळ, मुंबई, १९७८, पृ. ५२४.

२) तत्रैव, पृ. ९३०.

३) तत्रेव, पृ. ८५३

---

## भाषा आणि जीवन वर्ष ११, १९९३ची सूची

(१-हिवाळा, २-उन्हाळा, ३-पावसाळा, ४-दिवाळी)

**लेखक-सूची**

**लेखनसूची**

---

**सूचनाफलक**

१) मराठी अभ्यास परिषद आणि मराठी राज्य विकास संस्था, महाराष्ट्र राज्य यांच्या संयुक्त विद्यमाने दि. ३ आणि ४ मे १९९४ रोजी पुणे येथे शालेय स्तरावरील मराठी विषयाची पाठ्यपुस्तके या विषयावर एक चर्चासत्र आयोजित करण्यात येणार आहे. या चर्चासत्रामध्ये पूर्व प्राथमिक, प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक, इंग्रजी माध्यमांच्या शाळा इत्यादींचे अभ्यासक्रम आणि त्यांची पाठ्यपुस्तके यांच्यावरील चर्चा अपेक्षित आहे. या संदर्भात ज्या कोणा अभ्यासू व्यक्तीला सूचना करावयाच्या असतील त्या त्यांनी लेखी स्वरुपात पुढील पत्त्यावर पाठवाव्यात

२) **महाबँक मराठी भाषाविषयक लेखन पारितोषिक : १९९४**
महाराष्ट्र बँकेच्या सहकार्याने मराठीतील सर्वोत्कृष्ठ भाषाविषयक लेखनात रु.१५००/- चे पारितोषिक देण्याची योजना १९९३ पासून चालू आहे. १९९४ च्या महाबँक मराठी भाषाविषयक लेखन पारितोषिकासाठी १९९२-९३ या दोन वर्षातील प्रकाशित पुस्तके व हस्तलिखित लेखन विचारात घेतले जाईल. लेखकांनी आपले लेखन दि. ३० जून १९९४ पर्यंत पाठवावे. या विषयाबद्दल आस्था असणारांनी आपल्या वाचनात आलेल्या भाषाविषयक लेखनाचे संदर्भ कळवावेत.

**पत्रव्यवहारासाठी पत्ता -**

**मृणालिनी शहा, १, शीतल अपार्टमेंट, ४६/४, एरंडवन, पुणे ४११ ००४.**

**पैसे भरण्याबद्दल सूचना**

पैसे रोख दिल्यास आठवणीने पावती घ्यावी. चेक 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. मनीऑर्डर कूपनवर किंवा चेकसोबतच्या चिठ्ठीवर पैसे पाठविणाराचे नाव, पत्ता, रक्कम, आणि ती कशापोटी पाठवली, ते अवश्य लिहावे. नमुना अंक मिळाला असल्यास, कोणता मिळाला, याचा उल्लेख करावा. चेक बँकेच्या पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रक्कमेत ५ रुपये वटणावळ म्हणून भर घालावी. पावती मागाहून पाठवली जाईल.

**पत्रिकेची वर्गणी**

पत्रिकेची वार्षिक वर्गणी भरताना पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असेच राहील, हे लक्षात घ्यावे. पत्रिकेचे वर्षात चार अंक निघतात. मात्र १९८३ मध्ये केवळ दोनच अंक निघाले आहेत. पत्रिकेचे चालू वर्षाव्यतिरिक्तचे अंक हवे असल्यास मिळू शकतील. वर्गणीची आकारणी पुढीलप्रमाणे करण्यात येते :

चालू वर्गणी परिषदेच्या सामान्य सभासदांसाठी (सभासद–वर्गणी धरून) वर्षाला ४० रु.

चालू वर्गणी संस्था आणि सभासद नसलेल्या व्यक्ती यांसाठी वर्षाला ६० रु.

सुट्या अंकाला (मग तो चालू वर्षाचा असो, की मागील वर्षापैकी असो) १५ रु.

परदेशातील व्यक्तींसाठी वर्षाला १० डॉलर.

परदेशातील संस्थांसाठी वर्षाला १५ डॉलर.

सुटा अंक परदेशी पाठवायचा झाल्यास त्याची किंमच ४ डॉलर इतकी पडेल.

**परिषदेची वर्गणी**

सामान्य सभासदाची वार्षिक वर्गणी वर दिली आहे. एका घरात एकापेक्षा अधिक सामान्य सभासद असले आणि त्यांपैकी एकाच्याच नावावर पत्रिकेचा अंक हवा असला, तर इतर सभासदांनी केवळ २० रु. भरायचे आहेत. उदाहरणार्थ, एका घरात दोन सभासद आणि अंक एक अशी स्थिती असल्यास वर्षाला ४० रु. + २० रु असे एकूण ६० रुपये भरावे लागतील.

आजीव सभासदत्वासाठी ४०० रु. (परदेशातील व्यक्तीसाठी १०० डॉलर) हितचिंतकांसाठी १००० रु. (परदेशातील व्यक्तींसाठी २५० डॉलर) किंवा जास्त; आश्रय-दात्यासाठी ५००० रु. (परदेशातील व्यक्तीसाठी ५०० डॉलर) किंवा जास्त (आजीव, देणगीदार, आश्रयदाता सभासदांना पत्रिकेची वेगळी वर्गणी नाही)

परिषदेचे सभासदत्व व्यक्तीला मिळेल, संस्थेला नाही.

**जाहिरातीसाठी दर**

पूर्ण पान ७५० रु., अर्धे पान ४०० रु., पाव पान २५० रु., शुभेच्छासूचना १०० रु. आवरणपृष्ठ चार १००० रु., आवरणपृष्ठ दोन/तीन ८०० रु. जाहिरात हिंदीत वा इंग्रजीत चालेल, मराठी असल्यास उत्तम.

## आपण मराठी-अभ्यास-परिषदेसाठी काय करणार ?

— सभासद नसलात तर प्रथम स्वतः सभासद व्हा.
— सभासद असलात तर देणगीदार / आश्रयदाते सभासद आणि साधारण / आजीव सभासद मिळवून द्या.
— परिषदेसाठी काही नियमित वेळ देऊ शकत असाल तर चिटणिसांशी संपर्क साधा. परिषदेचे सर्व कार्यकर्ते आपले नित्याचे काम सांभाळून परिषदेची कामे करीत असल्यामुळे एकाच्या जागी चार कार्यकर्ते लागतात.
— परिषदेने प्रकाशित केलेल्या पुस्तकांच्या विक्रीसाठी साहाय्य करा.
— परिषदेचे काम वाढवण्यासाठी नवनव्या कल्पना सुचवा.

## आपण पत्रिकेसाठी काय करू शकता ?

— लेखन पाठवा.
— परभाषांतून अनुवाद करा.
— ग्रंथ परीक्षणे लिहा.
— 'पुनर्भेट' किंवा 'वाघिणीचे दूध' या सदरास योग्य अशा मराठी किंवा अन्य भाषेतील मजकुराबद्दल सूचना पाठवा.
— भाषेसंबंधी वार्ता, भाषादोषांची उदाहरणे, चांगल्या भाषेची उदाहरणे इत्यादींशी संबंधित वृत्तपत्रीय किंवा इतर कात्रणे पाठवा.
— पत्रिकेत भाषाव्यवहाराशी संबंधित हास्यचित्रे द्यायची कल्पना कशी वाटते ?
— जाहिराती मिळवून द्या.
— संस्था-वर्गणीदार मिळवून द्या.